संगीत

# उत्तरक्रिया.



— लेखक व प्रकाशक —

बॅ० विनायक दामोदर सावरकर

रत्नागिरी.



— मुद्रक —

म प देसाई, 'बळवंत मुद्रणालय' रत्नागिरी.



जुलै १९३३.



मूल्य १ रु.

# सूचना

—ooꕥoo—

या नाटकांत आलेल्या अैतिहासिक पात्रांच्या आणि प्रसंगांच्या चित्रणांत अैतिहासिक सत्याचा विपर्यास होअू न देण्याचा यथासाध्य यत्न केला आहे. तो कितपत साधला आहे हे जर कोणा जिज्ञासूस पडताळून पहाणे असेल तर त्यांच्या अुपयोगास्तव आधार ग्रंथांपैकी मुख्यत: श्री. सरदेसाअीकृत मराठी रियासत मध्यविभाग ४, कै. खरेकृत मराठी साम्राज्याचा अुत्तरार्ध खंड १, आणि बॅ. सावरकर कृत Hindupad Padshahi ह्या तीन पुस्तकांस निर्देशिणे पुरे आहे.

ज्या प्रतीवर नाटककाराच्या सहीची विशिष्ट मुद्रा ठोकलेली नाही ती ह्या नाटकाची प्रत अनधिकृत, ह्मणूनच चोरीची, समजली जाअील. ती कोणासही विकतां वा वापरतां यावयाची नाही.

लिपिसुधारणेचाही प्रसार व्हावा ह्मणून या पुस्तकांत 'अ' ची बाराखडी वापरली आहे. कागदही स्वदेशी आहे.

या नाटकाचे प्रयोग सध्या "भारतभूषण" संगीत मंडळी करीत असून यांत दिलेली छायाचित्रेही त्याच मंडळींतील नटांची आहेत.

# अुत्तर क्रिया.



## अंक पहिला.

### प्रवेश १ ला.

(पहिले माधवराव पेशवे वाड्याच्या अंगणात उभे आहेत. इतक्यात बाहेरच्या बाजूस गलका अैकू येतो.)

**माधवराव:**—पहारेकरी, दरवाजाबाहेर गलका कसला होत आहे?

**पहारेकरी.**—काही विशेष नाही, सरकार! अेक वेडी आज चार पांच दिवस येअून, भिक्षा घातली तरी न घेता आत घुसण्यासाठी त्रागा करीत असते. येतीजाती मंडळी तिची गंमत करून हंसत खिदळत असतात, अितकेच काय!

**माधवराव:**—भिक्षा घातली तरी न घेता वाड्यातच घुसू पाहते? ती ह्मणते तरी काय?

**पहारेकरी:**—वेडीच ती, सरकार! तिचें बरळणें तें बरळणेंच. ती ह्मणते या शनिवार वाड्याचा धनि कोण, तो मला हवा आहे! देवाने स्वप्नात येअून मला सांगितलें की, त्याची अेकदा चांगली कानउघाडणी कर ह्मणून! असे विचारीत हंसते, रडते, किंचाळते. ती कुठून आली, कुठें जाणार, आहे कोणाची, याची तिला स्वतःला तरी शुद्ध आहे की नाही, देव जाणे! पण रूप, रंग, भाषा, यावरून दिसते आहे कोण्या चांगल्या घराण्यातील बाअी!

**माधवराव:**—बोलवा तिला आत. ती तिची वेडी गंमत पाहण्याची आह्मालाहि अेक वेडी लहर आली आहे.

(पहारेकरी वेडीला आणतात.)

**माधवराव:**—बाअी, तुह्माला काय हवें आहे?

**वेडी:**—(मोठ्यानें हंसून) तें! अरे मला तूंच हवा आहेस! जसा मला स्वप्नात दिसलास तसाच, अगदी तसाच!—शनिवार वाड्याचा धनि तो तूंच! पण तुझें नाव काय?

पहारेकरी:—हां! मर्यादा सोडून अरे तुरे करशील तर—

माधवराव:—अं हं! दाबूं नका तिला असे. सांगा आमचें नांव तिला. आह्मी थांबतूं तोंपर्यंत ती जें जें विचारील तें तें सर्व सांगा.

पहारेकरी:—बाओी, श्रीमंत माधवराव पेशवे पंत प्रधान, ते हेच!

वेडी:—पेशवे? माधवराव? बरं, याच्या वडिलाचं नांव?

पहारेकरी:—श्रीमंत बाळाजीपंत अर्थात् नानासाहेब पेशवे!

वेडी:—त्याच्या वडिलाचं?

पहारेकरी:—बाजीराव बल्लाळ पेशवे!

वेडी:—त्याच्या वडिलाचं?

पहारेकरी:—बाळाजी विश्वनाथपंत भट. हेच पुढं पाहिले पेशवे झाले.

मुख्य वेडी.—(हर्षभरानं टाळ्या वाजवीत) भट? भट? तर मग तूं मूळचा
कै. भट आहेस? पुरे. झालं माझं काम! भटजीबुवा, मला सध्या पेशव्या-
कृत च्या वार्तांशी काम नसून एक तुझ्यासारखा भटजीच हवा होता! कारण
आहे. एक अुत्तरक्रिया करायची आहे लोक अुत्तरक्रिया! त्यासाठी भट हवा
द्या भट!

ती माधवराव:—कोणाची अुत्तरक्रिया करायची आहे तुह्मास? नीट शांत होऊन बोला.

वेडी.—कोणाची, कोणाची अुत्तरक्रिया ह्मणून सांगू तुला? अरे, ‘शनिवार वाड्याचा जो धनि आहे, तोच भट बोलाव आणि आमची अुत्तरक्रिया कर! तरच आमच्या अंतराळात तळमळणाऱ्या अतृप्त जीवांना अुत्तम गति मिळेल’ असे पानपती पडलेले सहस्त्रावधि अतृप्त वीरात्मे माझ्या स्वप्नात येअून ओरडत असतात. ते बघ माझे पतिराज, तो बघ माझा तरुण तनय! कुंजत पडले बघ ते रणात! ती बघ माझी मुलगी: अग बाओीग, घायाळ केली—रक्तबंबाळ केली नारे त्या राक्षसांनी! त्या माझ्या पतीची, मुलाची, मुलीची (पहारेकऱ्या-कडे बोट दाखवून) तुझ्या बापाची, तुझ्या काकाची, (माधवरावांकडे बोट दाखवून) नि तुझ्या काकांची!

माधवराव:—(दचकून) काय? आमच्या काकांची? भाऊसाहेबांची? अुत्तरक्रिया?

**वेडीः**—होय, त्याच तुझ्या चुलत्याची नि तुझ्या बापाची नि तुझ्या भावाची—विश्वासरावाची ! अितक्यातच दचकतोस काय असा ? आणखीं अैक—अग बाई ? पण माझ्या पायांत बोंचलं काय पुन्हां ? कांचा ! काचा ? ज्या वाटेनं पाअूल टाकावं त्या वाटेंत पिचलेल्या बांगड्यांच्या काचाचा ढीग ! घरोघर बांगडी फुटली. ते तुकडे पायांत बोंचून बोंचून रक्तबंबाळ झालं नारे हें माझें हृदय ! भटा, मला त्या फुटलेल्या लाखों बांगड्यांची अुत्तरक्रिया करायची आहे ! त्या लाखांचीं नावं अेका नावांत सागूं तुला ? त्या लाखाचं अेक नांव—पानिपत ! मला पानपतची अुत्तरक्रिया करायची आहे ! आणि त्या पानपतच्या अुत्तरक्रियेचा भट तूं !

**माधवराव:**—बाअी, तूं कोण, कुठली, वेडी आहेस की शहाणी आहेस तें काहींच कळत नाहीं. पण जर तूं खरोखरच वेडी असशील तर तुझें हें वेड या आमच्या पेशवाअींतील अगळ्या शहाण्यांच्या शहाणपणाहून अधिक शहाणें आहे, यात शंका नाहीं. निदान ज्या राज्यखुडाअू वेडानें आमच्या दादासाहेबांना नि सखारामबापूंना आजकाल पछाडलें आहे, त्या वेडापेक्षा जर हें तुझें पानपतच्या अुत्तरक्रियेचें वेड त्याना पछाडील ना, तर किती बरें होअील ! पण त्यानीं आज पुण्यातच पानपत माजविलें आहे. बाअी, पानपत झालें त्याच दिवसापासून मलाही तुझ्या याच वेडानें पछाडलेलें आहे. पण काय करूं; या शहाण्याच्या वेडाची बेडी माझ्या पायास ठोकली गेल्यानें मी आजवर पंगु होअून पडलों ! पण आता ती बेडी मीं तोडली आहे—आता माझें मी सर्व पाहून घेतों. तूं निश्चिंत रहा. ती पानपतची अुत्तरक्रिया मी करतों—तूं जा नि आपल्या नातेवाअीकाची अुत्तरक्रिया तेवढी यथास्थित कर जा. तुला काय हवें तें साहित्य दर्भांसुद्धा हे आमचे कोठीवाले पुरवितील.

**वेडीः**—दर्भ ? वेड्या, मला दर्भ नकोत, दळभार हवेत ! अेकेका व्यक्तीच्या अुत्तरक्रियेस दर्भ पुरतात, पण अेकाद्या पानपतच्या अुत्तरक्रियेस दळभार लागतात दळभार—दर्भ नव्हेत ! ह्यः ह्यः ह्यः आमच्या भटजीबुवाना अजून अुत्तरक्रियेचा अर्थच कळला नाहीं ! अरे पहारेकरी, दिल्ली पानपत पुण्याच्या कोणत्या दिशेस आहे ?

**पहारेकरीः**—अुत्तरेस.

**वेडीः**—हा हां. तर मग त्या अुत्तर दिशेस जिंकण्याची जी क्रिया ती अुत्तर-

क्रिया; आणि राक्षसांच्या हातून ती अुत्तर जिंकून घेतांना जे जे पानपतीं रणीं झुंजले, जे जे रणी पडले, त्याचं त्याचं अपुरं राहिलेलं तें कार्य, ती क्रिया, पुरी करणं, ह्मणजे पानपतची अुत्तरक्रिया करणं; आतां आलं का ध्यानांत?

**माधवराव:**—बाअी, तुह्मीं स्वतः पानपतास होतां की काय त्या झुंजींत?

**वेडी:**—ते मला काय विचारतोस? हे माझे केंस तुला दिसत नाहींत? (किंचाळून) पिशाच! पिशाच! अरे हे राक्षस मला नि माझ्या मुलीला केंस धरून गरगर फिरवित फरफटत ओढू लागले ना! हे रक्ताळ डाग, हा ठणका, हे तुटलेले—तुडविलेले, राकटलेले—विस्कटलेले केंस—यांना विचार मी कुठें होतें तें! अुत्तरक्रियेस तूं भटजी मिळालास. पण थांब, भटा थांब—आधीं अुत्तरक्रियेचें साहित्य जुळलं पाहिजे ना? वास्तव, वाजवा! आधी रणढोल वाजवा, फुंका! आधी रणशिंगें फुंका, चेंदा! आधी त्या पिशाचांनां चेंदा! हा नजीब, हा सादुल्ला, हा हापीज, हा बंगष—आधीं त्यांच्या हाडकें न हाडकें मला द्याः आधी त्या समिधा, मी आग, तूं भट—नि मग कर ती अुत्तरक्रिया! वा, शेवटीं बेत तर ठिक जमला! (मोठ्यानें हसत व टाळ्या वाजवीत) वेडाचा आनंद किती अपरंपार असतो! सहन होत नाही तो मला—मग या पुण्यात, साऱ्या महाराष्ट्रात अशी नाचत फिरल्यावाचून या वेडगळ आनंदाच्या कळा कमत्या थांबायला! (डमरूं वाजवीत गाणें गात नाचते.)

(गाणें)

सोनपत पानपत ॥
तुमची आमची गेली पत ॥
पादशाह हिंदुपत
ध्या ध्या सूड! ॥
साप विंचू मुंगुस पाल ॥
मराठ्यांनो करा वार ॥
मोगलांची तोडा ढाल ॥
दिल्लीच्या बादशाहीचं पाडा रणांत धूड ॥
मग अुत्तरक्रिया—आधीं भाअूंचा सूड! ॥
विश्वासाचा सूड! पानपतचा सूड! ॥

(गात नाचत निघून जाते.)

**माधवराव:**—हे आतां कोण मला भेटले ? ही वेडी—कीं पानपतच्या शल्यानें विद्ध झालेल्या महाराष्ट्राच्या हृदयांतील—मूर्तिमंत वेदना ? मीं कोणाच्या किंकाळ्या ऐकल्या ?—या वेडीच्या का पानपतच्या सूडासाठीं तळमळणाऱ्या माझ्या स्वतःच्याच अुत्सुकतेच्या ? भाअूसाहेबांची अुत्तरक्रिया ! भाअूंची वैयक्तिक अुत्तरक्रिया पार्वती काकूंच्या प्रेमवेड्या हट्टानें आजवर जी अपुरीच राहिली, ती आता काकूबाअी करू देवोत वा न देवोत ! अुत्तरहिंदुस्थानांत हिंदूंची सत्ता स्थापना करण्याच्या भाअूंच्या अपुऱ्या अिच्छेचा अश्मा, महाराष्ट्राच्या पराक्रमाच्या जरीपटक्याचे पदरांत असा पक्का बांधून, अबदालीचे नांकावर टिचून, पानपतचें अुट्टे काढून अुत्तर हिंद जिंकण्याचें तें भाअूंचें कार्य, ती भाअूंची महाराष्ट्रीय अुत्तरक्रिया तरी मीं यथाविधि संपादन करणार ! भिऱ्या शहाणपणानें बोथट झालेल्या महाराष्ट्राच्या तरवारीची धार पानपतच्या लढाच्या सहाणेवर धांसून मी तिळा ह्या वेडीसारखेंच वेड लावणार ! कारण, कीं

॥ पद १ ॥

अतिघोर संकट बिकट झंजावादळीं सहसा हता ॥
निबिड पंथीं पंथि जातां बुद्धिची तमसावृता ॥
धर्मरक्षणिं देव दावी मतिमतांही मतिहता ॥
बीज वेडाचीच ऐशा पेटवुनि पुढल्या पथा ॥

---

## प्रवेश २ रा.

**कोंडण्णा:**—दिवस मोठे कठीण आले खरे ! ही माधवराव बल्लाळ पेशव्याची राजवट ह्मणजे शुद्ध रूक्षपणाचं राज्य ! त्यांत हंसायची चोरी, बसायची चोरी, गायची चोरी, नाचायची चोरी ! अूठ की लढ, यावांचून या झुंजाररावांना दुसरें कांही सुचत नाहीं. वास्तविक हा गडी कोण्या भाडकुदळ अेकांड्या शिलेदाराच्या पोटीं जन्मास यायचा, तो वाट चुकून श्रीमंत नानासाहेब पेशव्याच्या पोटीं आला; ह्मणून राजा झाला. नाहीतर, राजेपण असं याच्यांत काडीचं देखील नाहीं. याचा आजा तो बाजीराव काय थोडा लढवय्या होता ? पण मस्तानीच्या रंगमहालांतलि रंग लुटण्याची रसिक राजकळाही त्याच्यांत होती. याचा बाप

नानासाहेब केवढा प्रतापी ! अटकेपासून रामेश्वरापर्यंत नुसत्या निरोप्यांकरवीं करभार याचा, दळभार हलावा. पण स्वतः स्वारी किती रंगेल--किती रसिक असे. छट, या माधवरावासारखा नीरस पेशवा झालाच नाहीं. हे शनिवार वाड्यांत असले की त्या राजवाड्याची राजकळा गेलीच ह्मणून समजावं. अहो, राजा ह्मटला कीं, दहा गायकिणी, दहा नायकिणी, दहा गवय्ये, दहा बजवय्ये, दहा विनोदक दहा विदुषक, दहा दास, दहा दासी सदा हंसत खिदळत आहेतः गाणी नाचणीं चालू आहेत, कोड्या कोटीक्रम, चुगल्या चकाट्या पिटीत आहेत, आणि त्यांत रगून राजा गादीवर लोळत आहे, असा शोभायचा. असा राजा त्या दादासाहेबांच्या पोटीच आला तर येशील ! कारण ते दादासाहेब राजवाड्यात धनि असले की, आमच्यासारख्या कसलेल्या विदुषक विनोदकाच्या गुणांचं काहींतरी चीज होतं. पण हे आमचे माधवराव वाड्यात धनि झाले की, शनवारच्या रंगेल राजमंदिरास त्यानी अेकाद्या अुदगीरच्च रुक्ष रणमैदान करुन सोडलंच ह्मणून समजावं ! ज्याच्या त्याच्या डोक्यावर याच्या करड्या भुंवअीची वाकडी तरवार सदा लटकलेली ! अहो, राजांनीहि लढाया मारल्याच पाहिजेत; पण त्या भाडोत्री घोडदळाकडून परस्परें मारव्या. राजेच जर सारखे स्वारीच्या घोड्यावर बसत राहिले तर राजगादीवर लोळत पडायचं कोणी ?—गोमाशानीं ? अं, हे कोण ? दादासाहेबांचे पुजारी घोंडण्णाशास्त्री ? या, शास्त्रीबुवा या !

**घोंडण्णाः**—( प्रवेशून ) काय कोंडण्णाशास्त्री ! अहो, आहांत कुठं ? भरलीं, तुमचीं साऱ्यांची शंभर वर्षे भरली ? अहो, अुत्तर हिंदवर पानपतचा सूड घेण्यासाठी स्वारी करण्याचं माधवरावांनी निश्चित केलं !

**कोंडण्णाः**—मरुदेत त्यांना ! पानपतचा ह्मणे सूड घेणार. जशी कांहीं पानपतची मेलेली पिढीची पिढी हे पुनः जिवंतच करणार आहेत. विशी तिशीच्या आंतच मरण्यास योग्य अशा या जनकोजी, विश्वासराव, भाअूसाहेब, यशवंतराव पवारासारख्या प्रजेचा महाराष्ट्रात सध्यां नुसता पूर आला आहे. मरोत ते जाअून तिकडे दिल्लीकडे. पण पूर्वपुण्याअीच्या आयुष्याची दोरी बळकट असलेल्या आमच्या दादासाहेबांसारख्या, ताराअूसारख्या किंवा अुरमादिबांसारख्या कुपट्ट जीवांस लवकर लवकर दिवण्याची, देहवाअीची वाट लागेतों तरी, मृत्यूचीहि छाति नाहीं, अिच्छाहि नाही. त्यांतहि आह्मी तर राजवाड्यांतले अेक शास्त्री, ज्योतिषी. फारतर स्वारीचा मुहूर्त पाहून दिला की संपलं आमचं काम !

**धोंडण्णाः**—पण शास्त्रीबुवा, तुह्मी राज्यांतले ज्योतिषीच नाही, तर अेक लढाअू जहागिरदार आहां. माधवरावांनी अशा झाडून साऱ्या अैतखाअू जहागीरदारांस त्यांच्या जहागिरीच्या करारा प्रमाणं स्वतः लढाअीवर जाणं भाग पाडण्याची सक्त आज्ञा सोडली आहे.

**कोंडण्णाः**—तरीहि मला ती आज्ञा लागू पडत नाही. कारण आमचे आजोबांना मूळ बुंदेलखंडातून बाजीरावांनी अिकडे आणलं, ते वाड्यात ज्योतिषी ह्मणून ठेवण्यास. पुढं आमचे वडील चार अुनाड शिलेदाराच्या नादी लागून लढाअीवर जाअू लागले नि त्यास स्वारीवर शंभर दोनश्यांचं पथक घेअून नित्य जावें ह्मणून त्या खर्चासाठी ही जहागीर मिळाली. पण आजोबांनी मला त्या अुनाड व्यवसायात न घालता मूळची ज्योतिष विद्या नि शास्त्र विद्याच शिकविली. अरे, ब्राह्मणानं घोड्यावर बसणं धर्मबाह्य ह्मणून त्यांनी मला जन्मात घोड्यावर देखील बसं दिलं नाही. नानासाहेबांचे वेळी मलाहि त्यांनी वाड्यातील ज्योतिषी ह्मणूनच नेमलं आणि पुढं आमचा विनोदी गमत्या स्वभाव पाहून त्यांचं मनरंजन करण्यांचं अगदी अंतस्थ कामहि आमचेकडेच दिलं. पुढं दादासाहेब आले नि त्यांनी तर आह्मांस साफ सांगून टाकलं की, तुला मी पेशव्याच्या विनोदक विदुषकाचा नि दासदासींचा मुख्य विश्वासू सरदार नेमला आहे. तं वाड्यातून हलत जाअं नकोस. पुरुषात ज्योतिष सांगत जा, [illegible] पोथी पुराण वाचीत जा, सर्वांस हंसवीत जा, स्वतः ख्यात जा खिदळत जा, नि [illegible]च्याकडे वाड्यातलि झाडून साऱ्या अंतस्थ कुलंगड्याची वार्ता पोंचवीत जा. बस. ही आमची कामगिरी जोंवरं आह्मी अेकनिष्ठपणं करीत आहों, तोंवर आह्मास स्वारीवर धाडणारे, वा नाहीतर आमची जहागीर जप्त करणारे हे माधवराव कोण?

**धोंडण्णाः**—पण शास्त्रीबुवा, हें शहाणपण या माधवरावास शिकवावं कोणी? अहो, ते दादासाहेब शहाण्याचं अैकत नाही ह्मणतात. पण ते निदान तुह्मा आह्मा खागीदांचं तरी अैकतात. परंतु या रावसाहेबांपुढं शहाण्यांच काय, खागीदांचं काय, कोणाचं कांही चालत नाही. तो राघोबा पुरवला पण हा रागोबा नको. तुमची तरी हें सारें माधवरावांचे तोंडावर सांगण्याची छाति आहे का?

**कोंडण्णाः**—छाती? अरे, त्याच्या बापाबरोबर, त्या प्रत्यक्ष नानासाहेबांबरोबर, मांडीशीं मांडी लावून नि हातावर हात मारून हंसले खेळलेले आह्मी—आह्मांस हा माधवराव ह्मणजे केवळ कालचं पोर! पुनः ज्योतिषावर जसा

दादासाहेबांचा विश्वास तसाच रावसाहेबांचाहि आहे. यास्तव अेक विद्वान ज्योतिषी म्हणून तरी ते मला अगदींच टाकाअू समजत नाहींत.

**धोंडण्णाः**—पण जहागिरी खाअून वेळीं लढाअीवर जाण्याचं नाकरणं आणि असं मरणाला भिणं तुम्हालाहि थोडं काळिमा लावणारंच नाहीं का? हो, आमच्यासारखे जे नुसते शास्त्री नि पुजारीच आहेत, त्यांना देखील लढाअी-वर धाडते तर मात्र माधवरावास खरा बोल लावतां येता.

**कोंडण्णाः**—अरे धोंडण्णा, मी मरणास भितों म्हणून का लढाअीवर जाण्याचं टाळीत आहें? अरे, माझ्या कुंडलीवरून माझं आयुष्य १०२ वर्षें, २ महिने, २ घटी, २ पळें नि २ विपळें आहे, असं ज्योतिष स्पष्ट सांगत असतां मला त्याचे आधीं प्रत्यक्ष यमदेखील मारूं शकणार नाहीं, मग अबदल्ली कोणच्या झाडाचा पाला? पण या अुत्तर हिंदवरच्या लढायांचें तत्त्वच मला मान्य नाहीं. दिल्लीवर मुद्दाम जाअून त्या गिलच्यांच्या नाकात काड्या घालीत बसणं, हा निवळ खोडसाळपणा नव्हे काय? आपलं पुणें बरें कीं आपण बरे. अशीं परक्याशी निष्कारण भांडणं कोणी अुकरून काढूं नयेत म्हणून तर आपल्या सत्वशील नि सहनशील परमपूज्य पूर्वजांनी सिंधुनदीची आपणा हिंदूंस अटक घालून दिली. तो पृथ्वीराज पहा. महंमद घोरी जर काबूल-हून दिल्लीवर येअूं शकला, तर काय पृथ्वीराजाला दिल्लीहून काबूलवर चढाअी करून जाता आलं नसतं? पण तो खरा हाडाचा हिंदु. आपण अटक ओलांडून गेला नाहीं. महंमद घोरीच जेव्हा ती अटक अुतरून अगदी दिल्लीला भिडला, तेव्हां मग काय तें त्यानं आपल्या तरवारीचं पाणी त्याला चाखवलं. तसा गिल-च्याला पुण्याला येअूं द्या, म्हणजे मग हा कोंडण्णा ज्योतिषी कसा विजेच्या ज्योतीसारखा त्याच्यावर हातात शीर घेअून तुटून पडतो तें तुम्हांस दिसेल? तसाच अेखादा बाका प्रसंग आला तर आम्हींहि लढूंच लढूं. पण अशा नसत्या भांडणांत तुझ्यासारख्या पुजारी पाणक्यांनींच मरावं. अरे, तूं मेलास तर पूजा चालविण्यास भटांचीं कारटीं घरोघर पडलीं आहेत. पण माझ्यासारखा ज्योतिषीमेला तर तर ज्योतिष विद्याच विधवा होअील विधवा! खरोखर, हिंदुधर्मास सिंधुनदीची अटक जशी आमच्या धर्मकारांनी घालून दिली, तशी महाराष्ट्रधर्मास मुळामुठेची अटक त्यांनीं घातली असती तर किति बरं झालं असतं! वास्तविक

पुण्याचं राज्य पेशव्यांस पुरें आहे. पानपतची विकत श्राद्धं घेऊन सव्यापसव्य करीत बसण्याशिवाय मीं तरी कांहीं रिकामटेकडाहि नाहीं, खोडसाळहि नाहीं.

**धोंडण्णा:**—रहा बुवा! स्नेही ह्मणून मीं आपली तुला वेळींच बातमी पोंचविली आहे. तूं वाड्यातच राहिलास तर मला हवाच आहेस. ज्या दादांच्या पक्षाचा मीं, त्याच पक्षाचा तूं. बरं जातों आतां पूजेची वेळ झाली. (तो जातो.)

**कोंडण्णा:**—या होल्ल्यानंच माझी कांहींतरी चुगली माधवरावांकडे केली असावी नक्की! दादा माझ्या तंत्रानं चालतात तें याला पहावत नाहीं. ह्मणून मला लढाअीवर मारविण्याचा ह्याचा हा डाव दिसतो. ठीक, बच्चंजी, मीं पण माधवरावास गाठून असा कांही बनाव बनविनों कीं, ही स्वारीच रद्द व्हावी वा मला तरी जावें लागूं नये. आणि ते न साधता मला जावंच लागलं तर ह्याच्या गळ्यालाहि माझ्याच बरोबर लढाअीचा गळफांस लागावा. दादाचे दोन्ही कान ह्याच्या अेकट्याच्या हातीं नाहींच लागूं देणार! (जातो.)

---

## प्रवेश २ रा.

(माधवराव, विसाजीपंत बिनीवाले दरबारांत बसले आहेत.)

**चोपदार:**—(प्रवेशून) सरकारच्या आज्ञेप्रमाणं अहमदशहा अबदालीचे जे वकील आले आहेत त्यांस घेऊन महादजी शिंदे दरबारास येत आहेत.

**माधवराव:**—येअूं दे त्याना. (चोपदार जातो) विसाजीपंत, पानपत होअून दोन वर्षेहि अुलटली नव्हती तोंच अबदलीनें आपण होअून आपले वकील पुण्यास धाडून मराठ्यांशी मैत्रीचा संधि मागून केला होता. आणि त्याप्रमाणं वागून आज गेल्या सहा सात वर्षांत आमच्याशीं कांहीं कटकट केली नाहीं. पण आतां पानपतच्या प्रसंगीं विघडलेली घडी बसविण्यासाठी मराठ्यांची अुत्तर हिंदवर ही जी नवीन स्वारी होत आहे तीमुळें घाबरून जाअून नजीबखान, बंगष, हाफीज रहमत, सुजा, अिंग्रज प्रभृति झाडून साऱ्या मराठ्यांच्या अुत्तरेकडील हाडवैऱ्यांनीं अबदलीस मराठ्यांवर पुनः चालून येण्याची भर दिली आहे. अबदलीनें हा वकील आज अितक्याचसाठीं धाडला असला पाहिजे कीं, मराठे दिल्लीस पुन्हां चालून जाअून पानपतचा वचपा काढूं ह्मणतील तर अब-

दल्ली यंव करील नि त्यंव करील असा धाक दाखवून त्या नुसत्या दपटशावारींच मराठयानीं स्वारीचा बेत रद्द केल्यास काम साधून घ्यावें. त्यांतहि हा वकील धाडला जरी अबदल्लीनें, तरी पढवला आहे नजीबखानानें. यास्तव शक्यतों आहे ती मैत्री : नाहीतर विग्रह : अशा निडर रोखानें अबदल्लीशी आज राजकारण बोलावें.

(महादजी शिंदे वकिलासह येतातः विनीवाले अुत्थापन देअून त्यास बसवितात्चः-)

**माधवरावः**—वकील महाशय ! काबूलचे शहानशहा म्हणून गाजत असलेले पेशवे सरकारचे मित्र अहमदशाहा अबदल्ली गाझी यांची प्रकृति बिघडली म्हणून बातमी आली तेव्हापासून आमचें मन अस्वस्थ आहे. तरी शहाची प्रकृति आता पुनः निरोग झाली की नाही तें वृत्त आपण आम्हास प्रथम सांगावें. त्यास आराम पडावा अशी आमची सदिच्छा त्यास आपण कळवालच ! शहांच्या कुशल निवेदनानंतर आज आपणास ज्या कार्यासाठीं अिकडे धाडण्याचे त्यांनीं श्रम घेतले असतील ते कार्यहि निःसंकोचपणें सांगावें.

**वकील**—अे हिंदुओंके सिरताज, तमाम हिंदुस्थानके राजाओंको, नबाब निजामोंको आपने पराक्रमके समशेरसे थरथरानेवाले महाराष्ट्रके पंतप्रधान, आपण विचारलेल्या कुशल प्रश्नाविषयीं अिस्लामी तख्तके शाहानशाह अहमदशाहा गाझी आपले फार फार आभारी आहेत ! आणि आपलेहि प्रतिकुशल विचारीत आहेत ! श्रीमंतानी शाह अबदल्लीशी जो दोस्तीचा तह केला, श्रीमंतास त्याची आठवणच नव्हे, तर त्याचा अद्याप आदरहि वाटत आहे हें पाहूनहि आम्हास संतोष वाटतो. त्या मित्रत्वाच्या नात्यानेंच अहमदशहा गाझी श्रीमंतास आमच्या मुखें अशी विचारणा करीत आहेत कीं, मागें भाअूसाहेबानी दिल्लीस हिंदुपदपादशाही स्थापण्याच्या अंतस्थ हेतूनें जी स्वारी केली, तशीच प्रचंड स्वारी नि त्याच हेतूसाठीं श्रीमंत माधवराव पेशवेहि करूं अिच्छितात आणि मराठ्यांच्या फौजेच्या अुलाढाली नि जमाव त्या रोखेंच होत आहेत, हें खरें काय ? पानपतच्या युद्धाचे प्रसंगीं ज्यांनी ज्यानीं शहा अबदल्लीस साह्य केलें, त्या झाडून साऱ्या मुसलमानी मातब्बर सरदारांना नेस्तनाबूद करून दिल्लीची अिस्लामी सलतनत साफ तबाह करण्याचें धाडस मराठे पुनः करूं पहात आहेत म्हणून नजीबखान प्रभृति बादशाही सरदारांनीं शहा अबदाल्लीचे दरबारीं फिर्याद केली कीं, अहमदशाहा गाझींनी अटक अुतरून

अिस्लामी सलतनतीचे रक्षणार्थ धांवून यावें नि पुनः अेकदां मराठ्यांचें दुसरं पानिपत करावें ! अहंमदशहा गाजी जागतिक अिस्लामी सलतनतीचे केवळ सिरताज ! त्यांस या बादशाही फिर्यादीकडे कानाडोळा करणें अशक्य. तेव्हां श्रीमंतांचे याविषयी काय ह्मणणें तें प्रत्यक्ष श्रीमंतांच्येच तोंडून अैकण्यासाठीं आह्मांस त्यांनीं—आमच्या धन्यानीं—अिकडे धाडलें आहे. पानपतला मराठ्यांची झालेली भयंकर मनुष्यहानि मराठ्यानीं विसरूं नये !

**महादजी शिंदे:**—वकील महाशय, शाहअबदालीनीं हा निरोप मित्रत्वाच्या नात्यानें धाडला असतां, त्यात आजच्या मित्रत्वापेक्षा कालच्या शत्रुत्वाचाच प्रतिध्वनि अितक्या बढाअीखोर धाडसानें घुमत आहे की, आपण वकील ह्मणूनच काय तो अिथे तो असा बिनधोक सांगूं शकलात ! ! पानपतास मराठ्याची झालेली मनुष्यहानी मराठे विसरले नाहीत ह्मणूनच तिचा वचपा काढण्यासाठी ते आज पानपतास पुनः जात आहेत ! पण शहाअहंदी मात्र त्याच्या गिलचे पठाणाची झालेली मनुष्यहानि विसरले असावेतसें दिसते. नाहीतर दुसऱ्या पानपतच्या गोष्टी त्यानीं अशा सहजासहजीं काढल्या नसत्या ! गिलच्यांचे नाकावर टिच्चून दिल्ली आणि कुंजपुरा मराठ्यानीं घेतला तेव्हा जी हजारों पठाण मराठ्यानीं कापून काढला तो अबदालीस आठवतो ना ? पानपतच्या मैदानांत अेकदा शिंदे होळकरानी आणि अेकदा मेहेंदळ्यानी अबदालीच्या साऱ्या सैन्यास दोन वेळा दोन तुंबळ झुंजीत पिटाळून त्याच्या छावणीत माघारें घातले तेव्हा दहा हजारावर मुसलमान कापला गेला तो अबदालीस आठवतो ना ? अगदी शेवटच्या लढाअींत अेका दिवशीत्या रणधीर भाअूसाहेबांनी पंचाहत्तर हजार गिलचा पठाण रोहिला मोजून मारला तो अबदालीस आठवतो ना ? जोंवर रणात झुंज चालू होती तोंवर प्राणास प्राण नि डोक्यास डोकें घेतल्यावांचून मराठा असा पडला नाही ! झुंज मोडल्यावर मग पळत सुटलेल्या मराठी बाजारबुणग्याची जी तुह्मीं कत्तल केलीत नि बायका मुलांसहि पाडाव करण्याची कापुरुषता गाजविलीत तींत मराठ्यांची जी मनुष्यहानि झाली तेवढीच काय ती तुमच्याहून अधिक झाली खरी. आणि त्या भ्याड क्रौर्याचा जो काय गर्व व्हावयाचा तो अहंमदशहा गाजीनीं सुखैनैव वहावा ! पण पानपत अबदलीपासूनहि अेक लाख गिलच्या रोहिल्यांचा बळी घेते हें ध्यानांत धरून मग दुसऱ्या पानपतच्या गोष्टी त्यांनीं बोलाव्या !

**वकील:**—पानपतचे स्वारींत आह्मीं बाजारबुणगे तेवढे अधिक मारले हें विधान निदान शिंद्यांच्या तोंडीं तरी फारच विसराळूपणाचें दिसतें. दत्ताजी शिंद्यासारखा अिरसाल सरदार तर बाजारबुणगा नव्हता ना ? त्याचा शिरच्छेद आह्मींच केला हें शिंदे विसरले नसतीलच !

**बिनीवाले:**—आणि ज्यांनीं रणांत घायाळ पडलेल्या त्या रणशूर दत्ताजीचा शिरच्छेद करण्याचें तें भ्याडकृत्य केलें त्या कुतुबशहास नि समंदखानास कुंजपुऱ्यास जिवंत पकडून, हत्तीवरून खालीं पाडून, भाअूसाहेबांनीं कुत्र्याच्या मोतीनें मारविलें नि दत्ताजीचा सूड घेतला हें अहमदशहाहि विसरले नसतीलच !

**वकील:**—गोविंदपंत बुंदेले, तुमचे दुसरे नामी सरदार, त्यांचें डोकें तरी आह्मीं झुजीतच कापलेंना ?

**बिनीवाले:**—तें ज्यानें कापलें तो आततायीखानहि तुमचा नामी सरदार; त्यासहि मराठ्यांनीं पानपतच्या भर झुंजींतच कापून काढून गोविंदपंताचाहि सूड अुगविला ना ?

**वकील:**—आणि जनकोजी शिंदे, पेशव्याच्या सरदारांचे सिरताज ? त्यास पानपतीं कोणी गर्दीस मिळविलें ? गिलच्यांनीं !

**बिनीवाले:**—आणि तुमच्या प्रत्यक्ष वजिराचा मुलगा ? अहमदशहाचा केवळ नाकातील बाल ! त्यास पानपतीं अुभा चिरून अबदलीच्या नाकास मिरच्या कोणीं झोंबविल्या ? मराठ्यांनीं !

**वकील:**—आणि विश्वासराव ? पेशव्यांचे प्रत्यक्ष युवराज ! त्याची काहीं लाज ? त्यांस अंबारींतले अंबारींत गोळी घालून आमच्या गिलच्यांनीं गारद केलें--ते ?

**बिनीवाले:**—ते धन्य झाले ! अभिमुख समरीं लढत, अविंधांवर नीट चालोन घेत, हत्यार चालवीत, धारातीर्थी, अेक पायहि मागें न घेता, वीरदेह ठेवून स्वर्गी गेले. पण तुमचे तोमरशहा ? शहा अबदालीचे प्रत्यक्ष युवराज ? दिल्लीच्या बादशहांच्या मुलीशीं लग्न लावून बादशहा बनण्यास आले—पण लाहोरास जातात तोंच लागोलाग रघुनाथरावांशी गांठ पडून मराठ्यांचा बेदम मार मिळतांच पळतां भुअी थोडी झाली; अटकपर्यंत पाठीवर घाव घेत, तंबू राहुट्या, डेरेदांडे, बायकामुलंसुद्धां टाकून जीव घेऊन सिंधुपार पळून गेले !

आह्मांस लाज वाटते ! पण ती त्या पाठीवर वार घेत जगलेल्या गिलच्यांच्या युवराजांची–अभिमुख झुंजत पडलेल्या मराठ्यांच्या युवराजांची नव्हे !

**वकील**:—त्याच न्यायानं आपण क्वचित् असेंहि ह्मणत असाल कीं, पानपतचे मराठ्यांचे सरसेनापति–स्वतः भाऊसाहेब, सन्मुख लढत असतां गिलच्यांनीं ठार केले ह्मणून ते तेवढे शूर आणि शहाअबदालीच्या केंसासही मराठी तरवार धक्का लावूं शकली नाहीं ह्मणून जिवंत राहिलेले शाह अहंमदशहा गाजी, जिवंत राहिले ह्मणूनच, पळपुटे !

**बिनीवाले**:—तसे कोणी मराठा बखरकार ह्मणता तर तोहि तुमच्या मुसलमानी तवारीखकारांसारखाच अेक बढाओीखोर खुषमस्कऱ्याच समजला जाता ! ज्याच्या पाठीवर मराठ्याचा वार असा लागला नाहीं, तो अहंमदशहा गाजी, अतिरथी भाऊसाहेबास शोभेल असाच प्रतिरथी होता, असेंच अुभा महाराष्ट्र मानीत आहे. मराठ्यांचा सर सेनापति पानपतीं मारला गेला पण गिलच्याचा मारला गेला नाहीं आणि त्यायोगें शेवटीं मराठ्यानीं मैदान सोडलें पण गिलच्यानीं राखलें–या अेकाच अर्थीं, आणि अेवढ्याचसाठीं कायती गिलच्यानीं पानपतची लढाओी जिंकली आणि मराठ्यानीं गमाविली असे आह्मी समजतों.

**वकील**:—वल्लाह ! निदान शेवटीं तरी मराठे पानपतचें युद्ध हरले हें आपण मानता तर मग ?

**शिंदे**:—नाहीं. पानपतची लढाओी आह्मीं हरलों हें खरें: पण पानपतचें युद्ध आह्मी अजून तरी हरलो नाहीं !

**वकील**:—शाबास ! सरदार शाबास ! कुस्तींत चीत झालों पण नाक असें माझेंच वर होतें, असें खरोखरीच ह्मणणारा पहिलवान आज आह्मीं प्रत्यक्ष पाहिला !

**शिंदे**:—आणि लढाओी आणि युद्ध या शब्दाचाहि अर्थ कळत नसता ‘ मराठे–गिलच्यांच्या ’ पानपतच्या महाभारतीय संग्रामाची चर्चा करावयास धजणारा बालिश बखरकारहि आज आह्मी प्रत्यक्ष पाहिला ! वकील महाशय, हरलेल्या लढाओीचा वचपा काढण्यासाठीं ज्या दुर्बळास पुन्हां लढण्याचें सामर्थ्य नसेल तो आपण त्या अेका लढाओीत हरलों हें मानावयास कचरेल ! पण पान-

पतची झुंज आह्मीं, मघा सांगितलेल्या अर्थी, हरलों आणि त्या अेका लढाअींत गिळच्यांनीं आमचा मोड केला हें स्पष्टपणें मानावयास महाराष्ट्र मुळींच कचरत नाहीं. कारण ज्या कार्यासाठी ती लढाअी झाली तें कार्य यशस्वी होईतों आणि त्या झुंजींतील हारीचा पुरा पुरा वचपा निघेतों तशा शेंभर लढाया लढण्याची धमक महाराष्ट्राच्या अंगीं अजून शिवशिवत आहे! शहा अबदल्ली अटक अुतरून मराठ्यांवर चालून आले ते केवळ कोणची तरी अेक लढाअी लढण्यासाठीं, नव्हते. दिल्लीच्या ह्मणजेच हिंदुस्थानच्या बादशाहीवर हिंदुपदपादशाहीचे पंतप्रधानांची सत्ता असावी कीं काबूलच्या शहा अहंमदशहा गाजींची, या मुख्य प्रश्नाचा निकाल लावण्यासाठी ते चालून आले. त्या स्वारींत हिंदुस्थानांतील झाडून साऱ्या मुसलमानांच्या फौजा अेकत्र होअून जी प्रचंड फौज अबदल्लीच्या हाताखालीं जमली, तिच्या मराठ्यांशीं अनेक लढाया, झुंजी, झटापटी अुडाल्या, त्या साऱ्या ज्या अेकाच संग्रामाचीं अंगें होत्या, हालचाली होत्या, त्या संग्रामास महाराष्ट्र 'पानपतचें युद्ध' असें आटोपसर नाव देतो. त्या युद्धांतील सर्वांत मोठी लढाअी पानपतास झाली. तींत भाऊ आणि अबदल्ली, "झंजा झंजावरि अुसळुनि आपपरा तमें ते ॥ ... दोघाप्रति बिलगले! झुंज घायाळ होते ॥" त्या दोघा सिंहांची ती झुंज अेकामेकाच्या अुदरात अेकमेकाचीं नखाग्रें घुसवून गुंतून, गुंगून जीं पडली ती थेट अुभयाचीं अुदरें विदारून बाहेर आलीं तेव्हाच ... सुटली! मराठी सिंह रणींच राहिला—पठाणी सिंह घायाळ होअून चीं चीं करीत काबूलच्या कुहरांत माघारा जाअून दडला. युद्धातील मूळ प्रश्न अनिर्णीतच राहिला; ह्मणून युद्धहि अनिर्णीतच राहिलें. दिल्लीच्या सिंहासनावर स्वतःच बादशहा ह्मणून बसण्याचे शहा अबदालीचे मनोरथ मनातच जिरून गेले!

**वकील:**—आणि दिल्लीस बादशाही गाजविण्याचे मराठ्यांचे मनोरथ काय सफळ झाले? भाअूसाहेबानीं मोंगल बादशहांस खुदानें बक्ष केलेलें दिल्लीचें तक्त फोडण्याचा अत्याचार करून जी औटघटकेची हिंदुपदपादशाही विश्वासरावास बहाल केली तेवढीच ना मराठ्यांची करामत?

**शिंदे:**—अर्थात्! त्या औट घटकेच्या मराठी करामतीनेंच मुसलमानांच्या आठ शतकांच्या करामतीस धुळीस मिळविलें! तो अत्याचार नव्हता—तो प्रत्याचार होता. वास्तविक दिल्लीचें, हिंदुस्थानचें, सिंहासन हिंदूंचें! तें पृथ्वीराजा-

पासून महंमद घोरीच्या तरवारीच्या बळानें मुसलमानांनीं जिंकलें. त्यास जर खुदानें बक्ष केलें असे ह्मणायचें, तर शिवाजी महाराजांनीं आपल्या तरवारीच्या बळानें रायगडचें सिंहासन स्थापलें तेंहि खुदानेंच बक्ष केलें, देवानेंच दिलें, असें तुह्मांसहि मानलेंच पाहिजे. पण औरंगजेब बादशहा दक्षिणेंत आला तेव्हां त्यास तें रायगडचें खुदाअी तक्त फोडण्यांत कांहीं अत्याचार वाटला नाहीं! शंभर वर्षे शिवाजीचें सिंहासन औरंगजेबानें फोडल्याच्या अपमानाचें तें शल्य आमच्या हृदयीं सलतें. तों आमचाहि दिवस आला आणि दिल्लींत घुसून त्याच शिवाजीच्या मराठ्यांनीं त्याच औरंगजेबाचे तक्तावर तो भाअसाहेबी घण घातला! अत्याचाराचा सूड प्रत्याचारानें घेतला! त्या औटघटकेच्या घणानें आठ शतकें गाजलेल्या [illegible]असी सलतनतीच्या मृत्युघंटेचा पहिला घणघणाट, पहिला टोला गाजविला! पानपतास वाहिलेल्या मराठी रक्ताचे पाट सुकून जातील, पडलेली दीड लाख तों मातीस मिळतील पण हिंदुवीर भाअ आठ शतकांचे अ[illegible] काढीत घण घालीत आहे आणि औरंगजेबाच्या तक्ताचे तुकडे त्या घावासरशीं खळखळ गळत आहेत हें दृश्य, हें चित्र, हिंदुराष्ट्राच्या डोळ्यापुढें युग युगें, नैमिषारण्यातील कोण्या द्वादशवार्षिक देदीप्यमान यज्ञकुंडाप्रमाणें स्फूर्तीच्या ज्वाळा फेंकीत प्रकाशत राहील! ती औट घटका मुसलमानांच्या आठ शतकी राज्यसत्तेच्या समाप्तीचा आरंभ होता! अशी अेक घटका साधण्यास अेका पानपताचें तर काय, पण दहा पानपताचें मूल्यहि देण्यास महाराष्ट्र सज्ज आहे! पानपतीं ज्यानीं ज्यांनी मराठ्यांचा घातपात केला त्याचीं त्याची डोकी ठेचून, पानपतचा सूड घेअून दिल्लीच्या बादशाहीची सत्ता हातीं घेअून, पानपतची लढाअी हरलों असलों तरी, पानपतचें युद्ध आह्मी जिंकणार!

**वकील**:—अच्छा! तिकडेही नजीबखान, बंगष, सुजाअुद्दौले, हाफीज रहमत अेक लाख फौजेनिशीं मराठ्यांकडून तें दहा पानिपताचें मूल्य वसूल करण्यास आपली वाटच पहात आहेत! शहाअबदाल्लीहि आपली गाठ पुनः अेकदा बहुधा घेतीलच! श्रीमंतांनी आतां आह्मांस स्वतः कायतो निरोप द्यावा की चाललोंच आह्मी!

**माधवराव**:—वकील महाशय! पानपतचे लढाअीनंतर शहाअबदाल्लींना दिल्लीची बादशाही दोन दिवस देखील हाती ठेवणं अशक्य झालें! नर्मदेपार होअन नानासाहेब ५० हजार मराठ्यांनिशी त्यांचे पाठीवर चालून येतच होते.

अबदालींच्या घरीं बंड, दारी फितूर, पुढें पावसाळा, मागें मराठ्यांचा दहशा; तरीहि अबदल्ली पुढें येते तर नाशच पावते. यास्तव शक्ति क्षीण होअून काबुली लागोलाग माघारे गेले. अबदल्ली जसे झुंजार तसेच दूरदेशी. पानपत जिंकणें म्हणजे पुणें जिंकणें नव्हे हें ते मनीं समजले. आणि नजराणे देअून आपला वकील पुण्यास धाडून त्यांनी पेशव्यांशी संधि केला. त्यांत त्यांनीं दिल्लीच्या बादशाहीची वाटेल ती वासलाद लावण्याचा पेशव्याचा अधिकार पूर्णपणें मानला. पंजाब तेवढा अबदालीकडेच रहावा असें ठरलें. पण शीखांनी, म्हणजेच हिंदूंनी, तोहि लागोपाठ अबदल्लीचे हातून सोडविला. याप्रमाणें हिंदूंची सत्ता–ज्यास तुम्ही काफरशाही म्हणता–ती नामशेष करून दिल्ली स्वतःचे हातीं ठेवण्याच्या ज्या हेतूनें पानपतचें युद्ध अबदालीनें ठाणलें, त्या राजकारणाची गोष्ट त्यास साध्य झाली नाहीं. त्यातहि आजतर रोहिले पठाणाचे हातून मला सोडवा, असे स्वतः दिल्लीचे बादशहानींच मराठ्यास विनविलें आहे. हें पहा बादशाही पत्र! हिंदुस्थानातील आम्ही हिंदुमुसलमान आपल्या बादशाहीचा प्रश्न आम्हास हवातसा सोडवूं. त्यात ढवळाढवळ करण्याचा मराठ्यांशी झालेल्या त्याच्या संधीप्रमाणें तरी अहमदशहा अबदालीस लवलेशहि अधिकार नाहीं. अितक्यावर संधि भंगूनहि त्यास विग्रहच करावयाचा असेल तर त्यांनीं सुखेनैव करावा. आमची अिच्छा अबदालीशीं मैत्री असावी. पण जर ते शत्रुत्वच करतील तर त्यासहि पाहून घेअूं! हाच आमचा निरोप! हेंच आमचें अंतिमोत्तर! ( अुठून जात जात )—

॥ पद २ ॥

लढविनाचि मीं । अजी, सबल, समर, धरुनि शिरिं देवा ॥
सजला, धजला, मजला, वधुं शतरिपु तरि वधिनाचि,
अभिमुख हत- होअिनाचि वा ॥ १ ॥

( माधवराव जातात. पडदा पडतो. )

———

## प्रवेश ४ था.

( सरदार विसाजीपंत बिनीवाले, शास्त्रीबुवा, धोंडण्णाशास्त्री व कोंडण्णाशास्त्री बसलेले आहेत. )

**शास्त्रीबुवा:**—आह्मी आपणास स्पष्टच विचारतों कीं पुण्यांत श्रीमंतांचें ब्राह्मणीराज्य आहे की कोण्या औरंगजेबाचें मुसलमानी राज्य आहे ! अहो, हा यशवंतराव धादात समुद्रगमन करून ख्रिश्चन मुसलमानांच्या देशांत राहून, त्यांच्या-बरोबर जेऊन आलेला बाटगा—त्यास श्रीमंतांनी सरदारीचीं वस्त्रें द्यावीं काय !

**कोंडण्णा:**—बरं, म्लेंछदेशीं जेवला तर स्वदेशीं येतांच गुपचुप हात धुवायचे नि मोकळं व्हायचं ! गुपचुप काय वाटेल तें करा. पण केलेलं सांगत फिरायचं ! अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम् ! अहो, तो फिरंग्यांची टोपीदेखील घाली ह्मणतात !

**बिनीवाले:**—मग समुद्रगमन केलें तरी त्यांस सरदारी देण्यास हरकत काय ! हिंदुपदपादशाहीचा तो हिंदुवीर अेक अेकनिष्ठ सेवक आहे !

**शास्त्रीबुवा:**—आपणाहि, सरदार विसाजीपंत बिनीवाल्यांनींहि, असं ह्मणावं ना? अहो ज्यानं समुद्रगमन केलं तो हिंदुच राहू शकत नाही !

**धोंडण्णा:**—हो, तो मुसलमानच झाला !

**कोंडण्णा:**—तो ख्रिश्चन झाला !

**बिनीवाले:**—तरी काय, आपण जर जन्मजात मुसलमानास किंवा टोपी-वाल्यासहि मराठी राज्यांत सरदारक्या देतों, तर यशवंतरावासारख्या जन्मजात हिंदूस ती देण्यात काय बिघडलें ! जातीचें जें काय ग्रामण्य असेल त्याचा प्रश्न निराळा—हा निराळा. ते पहा ते स्वतः येतातच आहेत आमच्याकडे ! त्यांचें तरी काय ह्मणणें आहे तें आपण सर्वजण अैकून तर घेअूं या प्रथम. ( यशवंत-राव येतात ) यावें, रावराजे यशवंतराव, यावं. फराशिसाचे गव्हरनर जनरल बहादुर यांनी तुह्मी युरोपमध्यें गाजविलेल्या कामगिरीची प्रशंसा करणारें आणि तुमचा परिचय करून देणारें जें पत्र धाडलें, तें पाहून श्रीमंतास परम संतोष झाला—आणि आपण समुद्रपार होअून जी अपूर्व पृथ्वीप्रदक्षिणा केलीत नि युरोपातील अनेक देशांत जें पाहिलें, अनुभवलें, कमावलें, त्याची आश्चर्यकारक माहिती आपल्या तोंडूनच थोडीशी तरी अैकावी ह्मणून त्यांनी आह्मास सांगितलें. तरी आमची ती जिज्ञासा आपण आता किंचिन्मात्र तरी पुरवावी.

**यशवंतराव**:—सरदार महाशय ! [illegible]वा शिंद्यांच्या पदरचा अेक राअूत. पानपतीं शिंद्यांच्या सेनेंत मीं होतों नि[illegible]ाच्या [illegible]रुण पत्नीसह तिची आअी मरठ्याच्या स्वारींतील अंतःपुरांत राजास्त्रि[illegible]ा परिचारिका ह्मणून असे. शेवटच्या रणधुमाळींत मराठ्यांची सेना अुधळल्यावर स्त्रियाचे रक्षणार्थ मोठी मारहाण झाली तीतच आह्मीं घायाळ होऊन पडलों. माझी तरुण पत्नी आणि तिची आअी ह्याहि कत्र्यारी अुसपून झुंजतांना घायाळ झाल्या—त्याचा पत्ताच नाहीं—बहुधा ठारच झाल्या असाव्या. मी दैवयोगानें दुसरे दिवशीं शुद्धीवर येऊन पळांतील कांहीं मराठ्यांसह अेका गांवीं आलों. तों तिथें अेका गिलच्यानें मला पकडून, माझें तरुण वय नि रूप पाहून मला गुलाम करून काबुलास नेलें. तेथून अेका अरब व्यापाऱ्यानें मला नेअून अेका फ्रेंच सरदारास विकलें. तो फ्रेंच सरदार ममताळू आणि गुणांचा मोठा चाहता निघाला. त्याच्याच आश्रयानें फ्रेंच सैन्यांत माझा प्रवेश होअून मी लढायांतून नांवालौकिकास चढलों, अिंग्लंड प्रभृति अनेक युरोपीय देशांत फिरलों, अमेरिकेंतहि गेलों. तेथें त्या माझ्या अुदार फराशिस धन्यानें मला गुलामगिरीतून मुक्त केलें. मी तसाच चीन जपान पहात देशीं फ्रेंच्यांचे पांदेचरीस परत आलों. त्यांनीं “ रावराजे ” ही पदवी देऊन माझ्या अिच्छेसाठी श्रीमंतांकडे पाठविलें. तो हा सेवेस येअून सादर झालों.

**बिनीवाले**:—आपण अमेरिकेंत गेलां ह्मणालांत, तो देश कोणीकडे आहे ? या लोकाचें नांव आपल्या अिकडे फारसें अैकिवात नाहीं. काय शास्त्रीबुवा ? पुराणांत याचें कांहीं नांवबीव आहे का ?

**शास्त्रीबुवा**:—सगळं कांहीं आहे. ‘ व्यासोच्छिष्टम् जगत् सर्व ! ’ हिमालयाच्या पलिकडे अुत्तरकुरु. त्यासच अमरकुरु ह्मणत. गावढळ लोकांनीं त्या अमरकुरूचेंच अमेरिका असं अडाणीरूप बनाविलं, दुसरं काय ?

**यशवंतसिंग**:—ही अमेरिका हिमालयाच्या अुत्तरेस नसून पृथ्वीच्या ज्या भागावर आपण राहतों त्याच्या अगदीं अुलट बाजूस ह्मणजे अेका अर्थी आपल्या पायांच्या बरोबर खालीं आहे. क्वचित् पुराणांत पाताल ह्मणून ज्याचा अुल्लेख आहे तो या लोकासंबंधीं असू शकेल. काय शास्त्रीबुवा ?

**शास्त्री**:—असू शकेल काय? आहेच ! तें तुह्मीं नको नव्यानं सांगायला ! पाताल आहे ! तेथें नागराज राज्य करतात ! तिथं मोठमोठे सर्प—फण्यार, मण्यार,

फुरशीं, घोणस, नानेटी, अजगर, राजवाड्या अेवढालीं विस्तीर्ण भुयारें बांधून त्यांत नांदतात. कोणी आपलीं पुच्छें तोंडांत धरून चक्रासारखे फिरतात. कोणीं प्रचंड पक्षांसारखे अुडत राहतात. पिंवळे धमक मोठमोठे नाग आपल्या देहाचीं वेटाळीं घालून, फणा काढून, डुलत असतात. पाताळ कुहरांत सूर्यप्रकाश नाहीं. पण या नागांच्या डोक्यावरील तेजःपुंज मण्यांच्या प्रकाशानं तिथं सर्वत्र दिव्य लखलखकाट पडलेला असतो. त्यांचीं वारूळें अितकी लांब नि खोल असतात कीं, त्यांचं अेक तोंड पाताळात तर दुसरं तोंड पुण्यांत! त्यांतून ते पाताळींचे नाग पृथ्वीवर येऊन अून खात पडलेले अनेक पुण्यवंत साधूंचे दृष्टीस पडतात. पण या पाताळखंडांत हे गृहस्थ जाअून आले ही मात्र निव्वळ थाप आहे, थोतांड आहे! नाग लोकीं—आणि मनुष्य!—अहो पाताळात द्वापारीं अेक भीम गेला कीं अेक अर्जुन! कलियुगांत—आणि पाताळी!—जाणंच शक्य नाहीं!

**कोंडण्णा**
**धोंडण्णा** }:—हो, जाणंच शक्य नाहीं!

**यशवंतराव**:—तुह्मी ह्मणता तशा पाताळांत तें शक्य नसेल. पण मीं पुराणांतील पाताळाची कथा सांगत नसून मी पाहिलेल्या प्रत्यक्षातील पाताळाची माहिती सांगत आहें—तिथें आपल्यासारखेच मनुष्य राहतात. तिथें हाच सूर्य असाच प्रकाशतो—नागाचे मणि नव्हत! फरक अेवढाच की, अिकडे दिवस असला की, त्या पृथ्वीच्या अुलट्या बाजूस सूर्य न दिसल्यानें रात्र होते. सूर्य तिकडे दिसूं लागला कीं अिकडे मावळतो नी आपली रात्र होते.

**बिनीवाले**:—ह्मणजे? आतां हा आपला भर दिवसः त्या अर्थी तिकडे भर रात्र असून लोक गाढ झोंपेत असतील ह्मणतां! केवढं आश्चर्य!

**शास्त्री**:—आश्चर्य कसलं—पाखंड! निवळ थापेबाजी! ह्मणे आकाशांतले सूर्यनारायण पाताळांत! पाताळ कुहरात सूय प्रकाशतो! वर्णाश्रम धर्माच्या हें साफ विरुद्ध आहे!

**धोंडण्णा**
**कोंडण्णा** }:—साफ विरुद्ध आहे! सूर्यप्रकाश वर्णाश्रम धर्माच्या साफ विरुद्ध आहे!

**बिनीवाले**:—बरं! पण तिकडे राज्य तरी कुणाचं आहे?

**यशवंतराव**:—युरोपियन–हे अिंग्रज, हे गोवेकर पोर्तुगीज, स्पॅनिस : या लोकांचं !

**बिनवाले**:—काय ? तिकडेहि अिंग्रजांचेंच राज्य ? ह्मणजे हे अिंग्रज असे आहेत तरी किती आणि गेले आहेत तरी कुठें कुठें? महा अुपद्व्यापी आहे हा अिंग्रज ! मोठा विस्मय वाटतो.

**यशवंतराव**:—सरदार ! अिंग्रज अमेरिकेंत राज्य करतात याचा आपणास अितका विस्मय वाटतो–पण मीं जर आपणांस प्रत्यक्ष पुरावा दाखवून असें सिद्ध करून दिलें की, या अमेरिकेंतच काय, पण चीन, जावा, सयामांतसुद्धां अस्सल आर्यवंशी आणि आर्यधर्मी हिंदु राजांची राज्यें होती, तर आपणास काय वाटेल ?

**शास्त्री**:—काहींअेक विशेष वाटणार नाही. रघु दिलीपापासून युधिष्ठिरा-पर्यंत आमच्या सर्व आर्यराजांनी साऱ्या पृथ्वीचे दिग्विजय केलेलेच होते.

**यशवंतराव**:—मग जर समुद्रगमन पाप आहे तर हे सारे आपले पूर्वज पापीच होते, असें ठरतें नव्हे का ?

**शास्त्रीबुवा**:—मुळीच नाही. त्यांनी पृथ्वी जिंकली पण समुद्रगमन केलं नाही. कारण तेव्हां पृथ्वीवर समुद्र ह्मणून नव्हतेच. सारी पृथ्वी सलग होती. तो प्रत्येक दिग्विजयी " प्रतस्थे स्थलवर्त्मना ! प्रतस्थे स्थलवर्त्मना ! "

**कोंडण्णा, धोंडण्णा**:—जितम् ! जितम् ! !

**यशवंतराव**:—अहाहा ! शास्त्रीबुवा, पृथ्वी जोंवर सलग आहे तोंवर तरी वाटेल त्या देशात गेल्यानें पाप लागत नाहीं, जात जात नाहीं, अितकें तरी तुह्मीं मानलेंत, हे तुमचे आभार आहेत. तर मग आतां सिंधुनदीच्या अटकेची अटक तरी तुटली ना ? ‘ स्थलवर्त्मना ’ का होअीना पण अरबस्थानापर्यंत–थेट फ्रान्सपर्यंत जाण्यात पाप नाहीं ना ?

**शास्त्रीबुवा**:—आह्मी तसं मुळी ह्मटलंच नाही ! असत्यम् ! अनृतम् ! !

**कोंडण्णा, धोंडण्णा**:—मनृतम् ! मनृतम् ! !

**यशवंतराव**:—तुह्मी तसेंच ह्मटलें होतेंत ! ही सलग पृथ्वीची अटक तुटली तशीच समुद्राच्या अटकेचीहि स्थिति. कारण निदान श्रीराम तरी दशयोजन

आयत, शतयोजन विस्तीर्ण असा समुद्र ओलांडून लंकेत जाऊन रावणाशीं लढले, हें तर कांहीं तुह्मांस नाकारतां येणार नाहींना?

**शास्त्रीबुवाः**—तुमच्यासारख्या वानरांनीं देवाची गोष्ट कशास बोलावी! न देव चरितं चरेत्! न देव चरितं चरेत्!!

**यशवंतरावः**—असो, पण आमच्यासारख्या वानरांनीं वानरांचीं चरितें तरी अनुसरण्यास हरकत नाहीं! लक्षावधि वानरहि समुद्र लंघून लंकेंत गेले पण त्यांस कोणी पंचगव्य पाजलें नाहीं, कोणी दूषिलें नाहीं!

**बिनीवालेः**—काय शास्त्रीबुवा, तुमचा बुद्धिवाद नि युक्तिवाद तुमच्याच अंगाशीं आला!

**शास्त्रीः**—बुडत गेला तो बुद्धिवाद नि युक्तिवाद! वचनात् प्रवृत्तिर्वचनान्निवृत्तिः! परदेशगमन 'समुद्रयातुः स्वीकारः' कलिवर्ज आहे; हा धर्म–बाकी हम कुछ नाहि जानते!

**कोंडण्णाः**—हम कुछ नहि जाणते!

**धोंडण्णाः**—हमे कुछ नहि जाणते!

**यशवंतरावः**—हें मात्र अगदीं बरोबर बोलतात–तुम कुछ नहि जानते!!! प्रथम जमते तों युक्तिवादच करता पण युक्तिवादात चीत होऊं लागलेत कीं मग ह्मणतां आह्मी युक्तिवाद करीतच नाहीं.

**बिनीवालेः**—शास्त्रीबुवा, कांहीं झालें तरी यशवंतरावांस म्लेच्छांनीं बळें बळें परदेशीं नेलें. समुद्रगमन पाप असलें तरी त्यांचे हस्तें तें गुलाम ह्मणून म्लेच्छांनीं धरून करविलें ना?

**शास्त्रीः**—पण ते परत येतांना तरी स्वतंत्र होते ना? मग हे समुद्रमार्गे परत कां आले? दुसरा मार्ग नव्हता तर तिकडे म्लेछांतच कां राहिले नाहींत! मग आमचं कांहीं ह्मणणं नव्हतं.

**कोंडण्णाः**—हो, हे तिकडे मुसलमानच कां झाले नाहींत? मग समुद्रानं परत येते तरी तें कृत्य वर्णाश्रमधर्माच्या विरुद्ध होतं ना!

**धोंडण्णाः**—हो, ते तिकडे किरिस्तावच कां झाले नाहींत? हिंदु का राहिले? सनातन धर्माचा हा अपमर्द कां केला?

**बिनीवाले**:—छे! छे! असा युरोपांतहि गाजलेला हिंदुवीर आपल्या हिंदु पाच्छाअीच्या सेवेस नित्याचा अंतरला नाहीं, पुनः परत लाभला, हें आपल्या हिंदु राष्ट्राचें सुदैवच समजलें पाहिजे. मला वाटतें, जातिदोषाच्या निर्वाहार्थ रावराजे यशवंतराव यांस कांही अल्पस्वल्प प्रायश्चित्त देअून हें प्रकरण मिटवणें राज्याच्या हिताचें आहे.

**यशवंतराव**:—प्रायश्चित्त! सरदार—पाप असेल तिथें प्रायश्चित्त संभवतें! आपल्या सदिच्छेविषयी मी आभारी आहें. पण माझ्या हिंदुराष्ट्राच्या कल्याणार्थ मी त्या सदिच्छेच्या लाभासहि बळी देणार! परदेशगमन हें पाप नाहीं, अितकेंच नव्हे, तर तें हिंदुराष्ट्रास अत्यंत अपरिहार्य झालेलें अेक पुण्यप्रद कर्तव्य आहे, असें मीं समजतों. यास्तव मी समुद्रगमनार्थ म्हणून तरी, अितर कोणचें राहोंच, पण नुसतें तुळशीपत्राचेंही प्रायश्चित्त घेणार नाही!

॥ पद ३ ॥

जी कामना। मना पापची ना। गमे जी परी।
पुण्या सुजाणा ॥ धृ० ॥
पडता हि काया। ती आचराया। कचरेन ना। जनधारणा।
भिअुनी जनांच्याहि मी दूषणांना ॥

सरदार, आज अिंग्लंडची आहेत तशीच मिसरपासून मेक्सिकोपर्यंत आपल्या भारतीय आर्यांचीं हिंदुराज्यें आणि हिंदुधर्म, हीं फैलावली होती—त्यांचे अवशेष मीं प्रत्यक्ष पाहून आलेला आहें. तीं कोणीं बुडविलीं? मुख्यतः ही परदेशगमन-बंदीची बेडी आपण होअून आपल्या पायांत ठोकून घेतल्यानें! अिकडून सैन्य, राजे, प्रचारक, नातेवाअीक देखील तिकडे समुद्रापार कोणी जाअीनासा झाला त्यामुळें, गंगेच्या प्रवाहाचा संबंध सुटतांच कालवे सुकून निर्जीवन व्हावे, तशीं तीं हिंदुराज्यें आणि हिंदुजनता तिकडे निर्जीवन होअून अहिंदूंनीं खाअून टाकलीं. महाराज, युरोपपर्यंत आपलीं सिंधुयानें—हिंदु आरमारें, जाअून जगताचा व्यापार आपल्या खिशांत ठेवीत होतीं, प्रत्येक सागरा महासागरावर हिंदुध्वज फडकावीत हिंदुवणिक निर्भयपणें प्रवासत असे—तो सारा जागतिक हिंदु व्यापार नि तीं हजारों सिंधुयानें कशांत बुडालीं? कोण्या महासागराच्या प्रचंड वादळांत? नव्हे, तर अेका संध्येच्या पळीतील वादळांत! परदेशांतील

पाण्यानें संध्या विटाळते, मुकटा विटाळतो, विजातीयांसह खाण्यानें जातच जाते, धर्मच बुडतो, या खुळापायीं जेव्हां रोटीबंदी नि तिच्यामुळेंच पुढें समुद्रबंदीची बेडी आह्मींच आमच्या प्रगतीच्या पायांत ठोकली—तेव्हां तीमुळें तीं आमची राज्यें नि तो सामुद्रिक व्यापार ठार बुडाविला! या मुकट्यापायीं मुकुट दवडले!

**शास्त्रीबुवाः**—पण धर्म राखला! संस्कृति राखली! हिंदूंना, हिंदुस्थानला, अरबस्थानच्या वा पुर्तुगालच्या म्लेच्छांचा विटाळ होऊं दिला नाहीं!

**यशवंतरावः**—हाय हाय, तेवढें देखील साधलें नाहीं. हीच तर अत्यंत भयंकर हानि या समुद्रबंदीनें झाली. अहो, जर मुसलमानांची अत्याचारी आकांक्षा अरबस्थानांत मूळ धरु लागली तेव्हांच आपले दहापाच राजकीय हेर जरी तिकडे असते तरी आपणास ती बातमी तत्काळ कळून, त्या वेळी अत्यंत प्रबळ असलेल्या हिंदु राष्ट्रानें अरबस्थानवर स्वारी करून त्या मूठभर मुसलमानास कळीतच चिरडून टाकलें असतें! अरबचा महंमद कासम सिंधु देशावर आला—तसा सिंधचा हिंदु दाहिर अरब देशावर चालून का गेला नाहीं? महंमद गझनीनें सोमनाथ लुटला—तुह्मी मक्केला जाऊन मक्का कां घेऊं शकलां नाहीं? मुख्यतः या परदेशगमन बंदीनें, या समुद्रबंदीनें, या रोटीबंदीनें! हिंदुस्थानास विटाळ होऊं नये ह्मणून आह्मी अरब पुर्तुगालला गेलो नाहीं. पण त्यायोगें हिंदुस्थानचाच अरबस्थान करून घेतलात, परशुराम क्षेत्राचेंच पुर्तुगाल करून घेतलेंत, याची वाट काय? मथुरेंत मशिदी, दिल्लीत औरंगजेब, काशींत गोकुशी—गोहत्या! मुख्यत्वें या रोटीबंदी—समुद्रबंदीपायी बाहेरची राज्यें गेली, बाहेरचा व्यापार बुडाला. आतलीं राज्यें बुडालीं, आतला व्यापार बुडाला, आणि शेवटीं ज्या मुकट्यापायीं हे मुकुट दवडले, तो मुकटाहि विटाळला—नव्हे, तो मुकटा म्लेच्छांनी साफ फेडून नेला! कारण खाण्यानें जात जाते या खुळचट भावनेपायीच लाखों हिंदु बाटून मुसलमान—ख्रिश्चन झाले! यास्तव ज्या घणानें भाऊनी दिल्लीचें मोंगल तख्त फोडलें तशाच कोण्या युगप्रवर्तक घणानें ही रोटीबंदीची—ही समुद्रबंदीची—बेडी तोडून टाकणें आमचें पुण्यकर्तव्य आहे. तें पुण्य मी पुनः पुनः आचरणार, मी संधि येतांच पुन्हा पुन्हा सिंधुगमन करणार! महाराज, एवढी उत्तर हिंदची स्वारी यशस्वी होऊन मुसलमानांची राजवट धुळीस मिळविली कीं पेशव्यांची गांठ इंग्रजांशीं पडणार. तेव्हां जर आजपासूनच पेशव्यांनीं हजारों व्यापारी, विद्यार्थी, भूसेना, जलसेना युरोपांत

घाडल्या नाहींत, आपले वकील पारिस, लिस्बन, लंडन, रोम अिकडे धाडून त्या युरोपच्या राजकारणाशीं संधान बांधून, अिंग्रजांविरुद्ध फ्रेंच, फ्रेंचांविरुद्ध पोर्तुगाल, असे अुठतांच त्याच्या यादवीचा लाभ अेकास अुठवून अेकास बसवून घेतला नाहीं, त्यांची मुद्रणकला, युद्धकला, देशभक्ति, संघटना, पेंचापेंची शिकून त्यांच्याच दारीं ठेंठावलं नाहीं तर अिंग्रज पेशव्यांस पुरून अुरेल, आहारी येणार नाहीं, हें निश्चित. हें मी श्रीमंतांस अत्याग्रहानें पटवून ही रोटी-बंदीची, समुद्रबंदीची बेडी तोडविण्याची, जगलों वाचलों तर मरेतों पराकाष्ठा करणार! सरदार, अिंग्रज अमेरिकेचें राज्य करतो याचा आपणास विस्मय कशास वाटायला हवा! आज तरी मराठे अिंग्रजाहून राज्यशक्तीत दुर्बल नाहींत. अजूनहि अमेरिका ओसाड आहे. तेथील बिनवारशी सोन्याच्या खाणींच्या रांगा आणि प्रदेशांची राज्यें अजूनहि नुसत्या जाण्यावारी जिंकतां येतील. फार नको, वीस हजार मराठी सैन्य नि शंभर झुंजार तारवें मजबरोबर द्यावीं—मीं अमेरिकेंत हिंदु राज्य स्थापून, नि सोन्यानें वांकेतों भरून तीं तारवें घेअून येतों! पण प्रथम ही रोटीबंदीची—ही समुद्रबंदीची बेडी तेवढी तोडा!

**बिनीवाले**:—यवराजे यशवंतराव, आपल्या या भाषणाने आह्मांला अेक अद्भुत दृष्टि लाभल्यासारखें होत आहे! लवकरच श्रीमंतांची आपल्याशीं प्रत्यक्ष भेट घडेल तेव्हां त्यांसहि आपण हें सर्व निवेदावें. अुत्तर हिंदच्या या स्वारीवर अेक प्रमुख सरदार ह्मणून आपली नेमणूक झालीच आहे. आज आपल्याविषयींच्या आमच्या आदराचें चिन्ह ह्मणून ही तलवार आपणास आह्मीं भेट देत आहोंत! स्वीकारावी ती! आणि निरोप घ्यावा!

( यशवंतराव तरवार घेतात. सर्व अुठतात. पडदा पडतो. )

———

## प्रवेश ५ वा.

( स्थळः—कोंडण्णांचें घर. )

**कोंडण्णा:**—फुटलं हो ! शेवटीं माझं कपाळ फुटलं ! बसलं हो माझं कब-रडं बसलं ! अयाअी ! मला लढाअीवर हा माधवराव धाडणार—नक्की धाडणार ! मला तलवार बांधावी लागणारः मला घोड्यावर बसावं लागणार ! घोडा ! बापरे त्या भयंकर प्राण्याच्या नुसत्या कल्पनेसरशीच भोंवळ येते, भोंवळ ! अयाअी !

**धोंडण्णा:**—( प्रवेशून ) अं ? हें काय ! ज्योतिषीबुवा, असे अगदी धाय मोकलून शोक कसला करताहात ? झालं तरी काय असं ?

**कोंडण्णा:**—मित्रा, मला लढाअीवर धाडण्याची सक्त आज्ञा सुटली रे शेवटी ! आठ दिवसाचे आत मला घोड्यावर बसता आलंच पाहिजे. ज्या चांडाळानं माझी माधवरावाकडे चुगली केली असेल त्याचं देव वाटोळं करील !

**धोंडण्णा:**—आणि ज्या चांडाळानं माझी चुगली माधवरावाकडे केली असेल त्याचंहि देव वाटोळंच करील ! कारण मित्रा, मला देखील लढाअीवर जाण्याची सक्त आज्ञा सुटली आहे ! आह्मी थोडं फार शास्त्र पढून दादासाहे-बांचे पुजारी झालों. पण त्याआधीं मी वाड्यातील आचारी असें. ही जुनी गोष्ट अुकरून काढून मला सैन्याच्या पाकशाळेंत धाडण्यांत येणार. केवळ आकसानं रावसाहेबांनीं माझ्या शास्त्रीपणाची अशी धिंड काढली. अकस्मात् ही आज्ञा अैकल्यापासून माझा जीव कसा अर्धमेला झाला आहे.

**कोंडण्णा:**—आणि माझा अर्धमेला जीव पुन्हां जिवंत होत आहे. तुझ्यासा-रख्या जिवलग मित्रास वाड्यांत अेकटाच सोडून जाण्यास माझ्या जिवावर आलं होतं. पण आता तुझी सोबत मिळाल्यानं लढाअीवर जाण्याचं तितकं जड जाणार नाहीं. चल बरोबरच लढाअीवर जाअून सोबती संगतीनं मरूं, चल !

**धोंडण्णा:**—तरी मला वाटलंच होतं. तूंच हें कर्म केलं असशील ह्मणून ! तुला मरायचंच तर मला घेतल्यावांचून तूं मरणार नाहीस ह्मणून ! कोंडण्णा, मीं तुला स्पष्टच विचारतों कीं, परवां तूं माधवरावाशीं अेकांतांत कांहीं लाळघो-टेपणा करीत होतास की नाही आणि त्या वेळी मीं दादासाहेबांचे वतीनं कांहीं कट करीत आहें ह्मणून माझं नांव घेतलंस की नाहीं ? बच्चंजी, खरं बोला नाहींतर असा तुमचा गळा घोटून—

**कोंडण्णा**:—अरे, अरे ! मित्रा हें काय हें काय ? मी लाळघोटेपणा केला असं गृहीत धरलं तरी साध्या लवचिक लाळघोटेपणास अशी करकच गळेघोटेपणाची शिक्षा ! कांहीं न्याय ! जाअूं दे तें आतां सारं. अेकाच संकटांत आपण दोघेहि सांपडलों आहोंत खरे. आतां मागचं सर्व विसरून आपण दोघे मिळून राहूं तर कांहीं पुढचा मार्ग काढूंच काढूं. अरे, दादांचे आधारानं पेशव्यांस गादीवर चढवणं अुतरवणं देखील आपण मागं करूं शकलों. पुनः दादाचे कान फूंकून लढाअी-वर जाण्याचं टाळणं कांहीं कठिण नाहीं !

**धोंडण्णा**:—छट आतां तें शक्य नाही. स्वारीवर गेलंच पाहिजे. आणि स्वारीवर जाण्यांत कांहीं धोकाहि नाही. अुलट स्वारीत जी कधी कधी चैन अुडते ती स्वयंपाकघरांतही अुभ्या जन्मांत साधत नाही. धोका स्वारीवर जाण्यांत नाहीं; धोका लढाअीवर जाण्यांत आहे. ती लढाअी टाळण्याची मी अुत्तम युक्ति योजिली आहे. ही स्वारी अेक वर्ष तरी बुंदेलखंड ते गोकूळ वृंदावन—अिकडेच माशा मारीत फिरणार आहे. तोंवर तीत तीर्थक्षेत्रें, लूटमार, गोप-गोपी, यांतच सैनिकांची नुसती चैनचंगळ चालणार. पुढं दिल्ली आणि लढाअी ! कीं मागं आपला सूं बाल्या ! कारण दिल्लीकडे माधवरावाचीं सैन्यें लढाअीत गुंततांच वाड्यात दादा बंड अुभारणार, हें नक्की झालं. त्यांनीं बंड अुभारलं की त्याच्या साऱ्या शागीर्दास त्यांनीं परत बोलावलंच ह्मणून समज. ह्मणून अूठ नि अेखाद्या खऱ्या जहागिरदारासारखा तरवार कसून घोड्यावर चढ, चल !

**कोडण्णा**:—तरवार कस ! घोड्यावर चढ ! अेकवेळ कैलास पर्वतावर चढतां येअील, कारण तो स्थिर आहे. पण भरधाव भडकलेल्या घोड्यावर आठ दिवसांत चढूं कसा ?

**धोंडण्णा**:—तें मी शिकवतों तुला. घोड्या—तरवारींत मी शिकारीच्या वेळीं दादासाहेबांस देखील हार जात नाहीं हें ठाअूक आहे तुला. पगार भरपूर देशील तर पाच दिवसांत मी तुला घोडस्वारींत पटाअीत करून सोडतों. अूठ रडून काय होतं आतां ?

**वेडी**:—( अकस्मात् प्रवेशून ) अरे, या घरांत कोणी पुरुष आहे काय ? बाअी, बाअी ! हा तर नुसत्या बायकांचा घोळकाच घोळका अिथं जमला आहे !

**कोंडण्णा**—अरेरे ही ती खुळी ! अरे, मार धक्के नि दे त्या ब्यादीस हुसकून !

**धोंडण्णाः**—थांब, थांब. या खुळीला पानपतला कुठं तरी भूतबाधा झाली आहे ह्मणतात. तरीहि त्या भूतबाधेंतच ती, लहर आली तर केव्हां केव्हां हात पाहून भूत भविष्य असं बरोबर सागतें ह्मणतात कीं यंव ! हात तर दाखवूं ये थोडा.

**वेडीः**—( नाचत हातवारे करीत )

> **सोनपत पानपत**
> **गेली गेली आमची पत**
> **पादशहा हिंदु पत !**
> **घ्या घ्या सूड !**

पण प्रिय काय सांगतें मीं तें ! हा तर सगळा बायकाचा घोळका ! अुगी अुगी छबकडी ती माझी ! ( कोंडण्णाच्या तोंडास कुरवाळते. )

**कोंडण्णाः**—चल हट !

**धोंडण्णाः**—बाअी तुह्माला आह्मी तांदुळ पैसे देअूं—पण आमचा थोडा हात पाहून काही भूत भविष्य सांगाल का ?

**वेडीः**—हो. हो. करा पाहूं तुमचे हात पुढें. ( त्या दोघाचा अेकेक हात धरून निरखून ) अगबाअी, पण हें काय अशुभ ! बांगड्या कुणी वाढवल्या तुमच्या हातातल्या ! बांगड्या भरूं हात बिन बागड्यांचे ! असे अभद्र हात कोण पाहाणार ते ! बरं पण कपाळ तरी पाहूं ? अगबाअी, ( किंचाळून ) कपाळ पांढरं फटफटीत ! कुंकू कोणी पुसलं तुमचं ? ( धोंडण्णास ) छबकडी ग ती माझी ! अुगी अुगी ! बायको पण बायको आहे !

**कोंडण्णाः**—आतां मात्र थोबाड रंगवून देअीन अं ! मला बायको ह्मणालीस तें शोभेल अेक वेळ, पण या आमच्या धोंड्यासारख्या धडधाकड धोंडण्णाशास्त्र्यास बायको ह्मणतेस ? हा पाहिलास पुरुषाचा बळकट हात—पाडूं दांत ?

**वेडीः**—तर मग मेल्या तो हात जर अेवढा बळकट आहे तर दाखीव त्या तुझ्या बापाला—त्या नजीबाला, त्या बंगष पठाणाला, त्या सादुल्ला रोहिल्याला !

मला तो हात दाखवायचा तर त्यांत बांगड्या भर नि मग दाखव ! हो हो, पण तुमचं भविष्य राहिलंच ! ( कोंडण्णास ) वा ! हत्तीवर बसलास कीं तूं ! पेशव्यांचे सरसेनापति तुला अंबारींत बसवून फुलांच्या माळा घालीत आहेत ! तोफांची वंदना झडत आहे तुझ्या सन्मानार्थ ! ( दचकून ) पण हें काय ? पळा, पळा, आग ! पेटलेत भडकलेत तुह्मी दोघेहि–बागुरड्याचं अंग चिरडलं ! कसा फटकन मज्जा मेंदू फुटून बाहेर आला ! आयायी ग ! जळा मेल्यांनो ! ज्या जिवाला जपतां त्यासुद्धां जळा, जळा, जळा. ( निसटून जाते )

**कोंडण्णाः**—( भयविव्हल होअून ) धोंडण्णा !

**धोंडण्णाः**—( ,, ,, ,, ) कोंडण्णा !

**कोंडण्णाः**—अरे तूं देखील घाबरलास कीं काय ?

**धोंडण्णाः**—( सांवरून ) छट्. थोडा धक्का बसायचाच अशा कृत्येंस पाहून. पण तिच्या बाष्कळ शब्दास काय मोजायचं! तुला,मला आग लागली ह्मणाली: पण वेड्या माझ्या खिशातल्या या भरलेल्या चिलमीनें देखील तिच्या शब्दाच्या ठिणग्यानीं पेट घेतला नाहीं ! चल अूठ, आता आपण भ्यालों कीं मेलों ! हं अगदीं थेट जातिवंत जहागीरदारासारखा ताठ हो. हा, बांध तो शेला कमरेला ! आणि असे पृथ्वी बांकवून टाकणारे पाय टाकीत ये माझ्या मागं घोड्यावर बसायला शिकण्यास ! ( तो पुढें नि लेचेपेचे पाय आपटित कोंडण्णा त्याचे मागून चालतो तोंच थांबून– )

**कोंडण्णाः**—पण मित्रा, मला घोडा शिकवणार कुठं तूं ? अुघड्या जागीं नाहीं. पडलों बिडलों तर पोरंटोरं अितक्या मोठ्यानें हंसतील कीं वाड्यांत थेट पेशव्यांस अैकूं जाअील तें ! तेव्हां, असं पहा, माझ्या तबेल्याचं अंगण रुंद आहे तरी बंद आहे. त्यांत मला शिकीव. पुनः अेकदम फार अुंच घोडा नको अं ! हं, जा तूं सगळी व्यवस्था कर. तोंवर घोड्यावर चालण्याचे आधीं मी जहागीरदारासारखा पायावर चालण्याची थोडी संवय करितों–(धोंडण्णा जातो) –हं ! हं ! शेला तर ठीक शोभतो. पण लढाअू जहागिरदार कट्यार खोंवतात नाहीं कंबरेस ?–हें काय कट्यारीसारखं पडलं आहे अिथं ? ( अुचलून ) लाटणें ! अुत्तम ! शिकतांना धार लागण्याची भीति नको. न्हाव्याचीं मुलं देखील प्रथम बोथट वस्तऱ्यानं मडक्यावर हात चालवण्यास शिकतात, ह्मणतात. हं, ताठ ! असं ! वाग माझे छाती वा ! खूप वर आलीस ! हं पायांनो ! झुंजार जहागिर-

दाराचे आहांत ! ( आपटीत ) असं-असं ( अैटींत जातो. ) ( तोंच आंतील पडदा अुघडून धोंडण्णा घोडयासह दिसतो. )

**धोंडण्णाः**—या जहागिरदार ! या ! वाः चालतोस तर थेट भाऊसाहेबा-सारखा ! पण हें काय कंबरेस शेल्यांत खोवलं आहेस ?

**कोंडण्णाः**—हंः हंः हंः ! हात कापून घेशील ! तो माझा खंजीर आहे खंजीर ! खऱ्या खंजिराशी प्रसंग पडेतों मी याच खंजिरानं मराठयांच्या साऱ्या शत्रूंच्या छात्या भोसकणार ! अरे पण हें काय चिन्ह !

**धोंडण्णा**—तुला ज्या घोडयावर सहज बसायला शिकता येअील असाच हा ठेंगू आणि सुंदर घोडा आणला आहे ! का फारच ठेंगू वाटतो की काय ?

**कोंडण्णाः**—ठेंगू ? अरे अेकादा खंदा स्वारसुद्धा अशा भयंकर अुंचीस नुसतं पाहूनदेखील भोंवळ येअून पडेल ! अरे हा काय घोडा, का जेजुरीची दीपमाळ ! का तारवाची डोलकाठी—का नारळीचं झाड ? का बळीला पाताळी घालताना आकाशापर्यंत वाढलेल्या वामनाच्या पाठीचा कणा ? हें बघ, असा घोडा आण—असा अितका ! ह्मणजे माझी माड चळताच मला भुअीवर असे पाय ज्यावरून सहज टेंकता येतील अितका अुंच, आणि तो भडकून भर-धांव सुटला तर पाय भुअीवर टेंकून त्याला पायाच्या पुलातून तसाच भरधाव पुढं निघून जाता येअील इतका रुंद ! घोडयाची तशी अेखादी जात असेलच !

**धोंडण्णाः**—घोडयाची तशी अेकच जात आहे !

**कोंडण्णाः**—आहे ना ?

**धोंडण्णाः**—होय, पण तिला गाढव ह्मणतात ! त्यावर स्वारी भरायला शिकण्याची तुझी इच्छा नसेल तर याच घोडयावर बसायला तुला शिकलंच पाहिजे ! चल तर मग. हं हात दिला मी, घे अुडी, घे.

**कोंडण्णाः**—( अुडी घेताना निसटून ) अरे बाबा, आता थोडं तरी माझं अैक. माझे आजोबा घोडयावर असे, त्याच्या वरातींत काय ते बसले होते. तेव्हा ते ज्या युक्तीनं वर चढले ती सगळयात फक्कड युक्ति आहे. नवरीशेंहि चटकन् घोडयावर बसतात तसे.

**धोंडण्णाः**—हं, वाटेल ती युक्ति करा, पण अहो रडतराऊत घोडयावर बसा अेकदाचे ! कोणती ती युक्ति ?

**कोंडण्णा**—ही दाखवतोंच अं! ( आंत धांवत जाऊन अेक घडवंची घेऊन येतो ) हं, धोंडण्णा, आतां जर का तूं असा हीः हीः हीः दांत काढून माझा अुत्साहभंग केलास तर या खंजिरानें भोसकून काढीन अं! ही घोड्यावर चढण्याची आमच्या आजोबाची रिकीब आहे! यांत हंसण्यासारखं काय आहे? तीवरून हा बघ चढलों घोड्यावर. घोड्याला हालूं देऊं नकोस अं! (घडवंचीनं तो घोड्यावर चढतांच धोंडण्णा घडवंची दूर करितो ) अरे, ती 'रिकीब कुठं नेतोस! अरे गेला झोंक! धोंडण्णा आण घडवंची, घडवंची!

**धोंडण्णा**—जहागिरदारजी, आतां ठोका घडवंचीस--त्या तुमच्या आजोबांच्या रिकीबीस रामराम! आता संभाळा, हाकतों अं घोडा! हट.

**कोंडण्णा**—अरे मुहूर्तावर तरी हट म्हण! थांब पळभर; बाकी आहे मुहूर्ताला! अरे चांडाळा, झोंक चालला! ( घोड्याच्या मानेस घट्ट मिठी मारतो नि धोंडण्णा हट् करून घोड्यास मारतो तोंच पडदा पडतो. )

---

## प्रवेश ६ वा.

( स्थळः–यशवंतरावांचें अंतःपुर )

**नंदिनीः**—( स्वगत ) रावराजे यशवंतराव आज स्वारीवर जाणार. त्यांच्या ह्या होणाऱ्या ताटातुटीमुळें ही त्यांची नवयौवन नवदयिता सुशीला अशी कासावीस झालेली पाहून मलाहि कसंसंच होत आहे. तिचं सांत्वन तरी काय करूं? कांहीं तरी आवडीचा विषय काढून हिचा वेळ काढला पाहिजे ते येअीतों! ( सुशीला येते ) सुशीले, नाहीं आले रावराजे? अग अजून स्वारीच्या प्रस्थानाची दुसरी नौबद देखील झाली नाहीं तोंच कसे येतील बरं? पहिला नगारा पहांट फुटतांच झाल्याबरोबर जी सैन्याची सज्जता करण्यास ते गेले ती सज्जता तर झाली पाहिजे ना? कांहीं झालं तरी निघायच्या शेवटच्या तिसऱ्या नौबदीआधीं आल्यावाचून कधीं कधीं राहणार नाहींत ते! अग तूंचना त्या तुझ्या सुनीतिबाअीच्या, तुझ्या वडील बहिणीच्या, पानपत प्रसंगींच्या धैर्यास वारंवार वाखाणतेस? मग तिच्या धाकट्या बहिणीस शोभेल असं धीरानं घ्यायला नको का तुला? खरंच, सुशीले, तुम्हीं पुण्यास आल्यापासून गेल्या दोन तीन महिन्यांत तुझी माझी अितकी दाट मैत्री झाली पण तुझ्या ताअीची नि तुझी यशवंतरावांशीं ओळख कशी होत गेली तें विचारतां विचारतां

राहूनच गेलं. तुझ्याआधी तुझी ताअीच यशवंतरावांना दिली होती ना? तूं केवढी होतीस तेव्हा? सांग तें सगळं थोडक्यांत.

**सुशीलाः**—सखे नंदिनी, माझ्या चिमुकल्या जीवनाचा तो चिमुकला जुना अितिहासच मघांपासून माझ्या मनापुढं सारखा अुभा रहात आहे! माझी ताअी पंधरासोळांची नि मीं दहाअेक वर्षांची असेन तेव्हां. तेव्हां यशवंतराव शिंद्यांकडचे अेक राअुत होते. त्यांस माझी ताअी दिली. पण वर्ष अुलटलं न अुलटलं तोंच पानपतचा प्रसंग आला. मला मावशीच्या घरीं ठेवून माझे बाबा नि यशवंतराव शिंदेशाही स्वारांत आणि माझी सुनीतिताअी नि आअी राजस्त्रियांच्या परिचारिका वर्गात अशी पानपतीं गेली. तों तिथं प्रळय झाला. बाबा झुंजेत ठार होअून पडले, यशवंतराव घायाळ होअून पडले, माझी आअी नि सुनीति ताअी त्या मेल्या गिलच्यानीं मराठी स्त्रियांवरहि हल्ला केला तेव्हा झुंजत रणींच राहिल्या—ठार झाल्या की काय तो पत्ता नाही. पण त्या धामधुमींत सुनीति ताअीनं भयंकर घाव लागलेला असता अेका राअूता हातीं मावशीला निरोप धाडला कीं तिची आशा सोडावी आणि यशवंतराव परत आल्यास त्यांसच मला—या तिच्या धाकट्या बहिणीला देण्यांत यावी. या निरोपाची खूण ह्मणून तिनं ही मुद्रा धाडली. या मुद्रेसह तो निरोप मावशीस मिळाला. पण १० वर्षं यशवंतराव बेपत्ता होते. पुढं पराक्रमानं रावराजे होअून गेल्या वर्षीच मावशी आजारानं मरणोन्मुख असतां ते अकस्मात दाराशी येअून थडकले. मावशीनं त्याना तात्काळ ओळखलं, माझा हात त्यांचे हातीं त्या ताअीच्या निरोपासह दिला नि मावशी पण हें जग सोडून गेली. आणि आतां तो हा माझा कांतहि, मागं जसं माझ्या ताअीस, तसंच आज मलाहि अेकाकी सोडून त्याच पानपताकडे तसाच अेका भयंकर लढाअीवर जात आहे!

॥ पद ४ ॥

**त्यजुनि सखा। समरि आज जाअी, गे ॥**
**सोसु विरह कैसा पलपल दिनरात हाय हाय ॥**
**मी, देअि हसत वदनि निरोपा ॥**
**परिगे हृदयिं रडत धायधाय ॥ १ ॥**

अग, पण हे आलेच रावराजे बघ! थोडीशी आंत होशील का अशी?

(नंदिनी जाते. यशवंतराव येतात.)

**यशवंतराव**:—सुशीले, अहो सरदारीणबाई, आतां सरदारपणाला शोभेल असा अुत्तेजक निरोप द्यावा आझाला! स्वारींतील झाडून सारा दळभार शस्त्रास्त्रांनीं सज्ज झाला. प्रहर अर्ध प्रहरांत प्रस्थानाचा तिसरा नगारा झडतांच पुढचा पाय पुढें टाकून आह्मीं अुत्तर हिंदवर चालून जाणार! आतां तो मधला वेळ तेवढा केवळ तुझा नि माझा. तर चल ये, वीरकर्तव्याच्या सुटींत हंसत खेळत आणखी दोन प्रेमाचे शब्द बोलून घेअू ये. हं, जरा, जरा, तशीच अुभी रहा पाहूं! अहाहा खरंच सुशीले, अग आनंदाची बातमी ती सांगायची राहिलीच! सखे, तुझी हरवलेली ताअी मला पुनः सांपडली! अग खरंच! तुला देखील मी ती प्रत्यक्ष दाखवली तर काय देशील?

**सुशीला**:—हें काय अद्भुत सागतोस सख्या!

**यशवंतराव**:—अद्भुत कशाच! तुझ्या ताअीला प्रत्यक्ष बघ! मग तर झालं ना? ये, अशी अिकडे ये. (आरशासमोर येताच) बघ! ती बघ तुझी ताअी! माझी हरवलेली सुनीति! नी लवलवती तरुण तनुलता, ती सुबक हनुवटी, तें हंसतमुख—लाजली, लागली लपायला, झाली पाठमोरी!

**सुशीला**:—अिश्श! असं फसवायचं अं मला!

**यशवंतराव**:—वा! तूं मला फसवतेस की मी तुला! सुशीला असून सुनीति दिसतेस! खरंच, तुझ्या या नितळ गोऱ्याअंगा तुझी ताअी ओतप्रोत भरून किती खुलून दिसते आहे!—जशी कांचेच्या शुभ्र पात्रात गुलाबी मदिरा; जशी स्वच्छ आकाशात अुषा!

**॥ पद ५ ॥**

**आकाशी काय अुषा अुगवतां खुलावी ॥**
**मदिराची कांचेच्या कुपिंत कीं गुलावी ॥**
**मोत्यांतुनि आरक्तिम कान्ति जशि डुलावी ॥**
**नवती तव तनुतिलही त्यासची तुलावी ॥**
**विरत तपस्याहि जिच्या रतिसुखा भुलावी ॥ १ ॥**

**सुशीला**:—खरंच का मी अगदी ताअीसारखी, त्या पानपती पडलेल्या तुमच्या वीरांगनेसारखी दिसतें?

**यशवंतराव**:—अग, अगदीं सारखी नसलीस ह्मणून काय झालं? पानपती पडलेल्या भाअूंचे, जनकोजींचे, यशवंतराव पवारांचे तोतये जे जिकडे तिकडे

अुत्तरक्रिया



यशवंतराव:--साऱ्या तोतयांत हा तोतया पक्का खिलंदर निघाला !

[ पृष्ठ. ३३ ]

अुठले आहेत ते तरी कुठें अगदीं थेट त्यांच्यासारखे दिसतात ! तसाच तुझ्या ताअीचाहि अेक तोतया तूं ! फरक अितकाच कीं त्या सार्‍या तोतयांत हा तोतया पक्का बिलंदर निघाला. तिचें सरदारपद कसें अचूक पटकावलें !

**सुशीलाः**—असं लागट काही मीं बोलूं देणार नाहीं अं ! माझ्या ताईसारखे माझे रूपगुण नसूंद्यात, पण कांहीं झालं तरी मी तिची तोतया नाहीं--प्रतिनिधि आहें प्रतिनिधि ! ही पाहिलीत तिची मुद्रिका ! या मुद्रेनं तिचे सारे अधिकार तिनं मला दिले आहेत !

**यशवंतरावः**—होय ना ? तर मग त्या वीरांगनेच्या प्रतिनिधीस शोभेल असे ते अधिकार बजाव पाहूं आताचे आता ! पानपतीं जाता तिनें जसा मला हंसत निरोप दिला, तसाच आता पानपतच्या सूडासाठी जाताना, सखे, तूंहि दे चल ! वीरांगनेसारखी हंसत हंसत मला लढाअीवर धाड !

**सुशीलाः**—वीरा, वीरागनेसारखी मी तुला लढाअीवर धाडतें--पण हंसत हंसत मात्र नव्हे ! तूं किती जरी मारून मुटकून मला अशी वीरागना बनविलीस, तरी मी मूळची अेक नुसती अगना--अेक अबला आहें ! सजणा, सजणा, तुझं जायचं नाव निघताच माझा जीव कासावीस होतो त्याला काय करूं ? ‘ सुशीले ! सुशीले ’ ह्मणून वरचेवर येणारी तुझी मोहक हाक अैकण्याची माझ्या श्रवणाना, तुला डोळे भरून पाहण्याची माझ्या नयनाना, तुझ्या जिवलग जवळिकेची माझ्या जिवाला लागणारी ही तिहेरी तहान, जिवलगा, तूं दूर जाताच मी कशी सहन करूं ! हे माझे डबडबलेले डोळे तूं आज जसे माझ्या पदरानं पुसीत आहेत तसे अुद्यापासून कोण पुशलि ! त्यातहि ज्यानी सख्याच्या संगतीचं सुख मनसोक्त चाखलं त्या सुखावलेल्या दयिता आपल्या दयितास हंसत हंसत दूरदेशी धाडोत, पण प्रणयाचा परिचयही जिला पुरता झाला नाही त्या मला तो माझा प्रियकर लढाअीवर जाताना सुखाचं हंसू येईल तरी कसं !

॥ पद ६ ॥

दूरदेशि तू जाशि प्रियकरा । माझे ।
व्याकुल होती प्राण ॥
नवतीच्या मी मद्य भरिला प्याला करूं जो पान ॥
तव विरहाच्या येत्या पायीं जात लवंडूनि हा नं ॥

आतां हंसऱ्या आसवांनीं नव्हेतर हळुवार आंसवांनीं भरलेल्या या माझ्या हृदयाच्या विव्हल प्याल्यावांचून, प्रियकरा, मजजवळ तुला जाती भेट देण्यास दुसरं कांहींच अुरलं नाहीं !

**यशवंतराव**:—हाय हाय ! सखे सुशीले, तुझ्या विरहानं अुचंबळून येणाऱ्या ज्या माझ्या शोकाला मी विनोदाचं धरण बांधण्याचा अितका वेळ जाणून बुजून प्रयत्न केला त्या शोकाचा पूर त्या धरणासच वाहून नेत माझ्याहि जिवाला शेवटीं पार बुडवूं लागला आहे ! पण काय करूं ! तुला सोडवत नाही ह्मणून लढाअी सोडून अिथंच राहूं तर—

**सुशीला**:—छे छे ! वीरा, हें काय बोललांत ! तुह्मी राहूं ह्मटलंत तरी मी तुह्मांस रहा ह्मणणार नाहीं ! तुमच्या वियोगानं या डोळयातून नुसते पाण्याचेच अश्रु वहातील पण अविंधानं पानपतीं हिंदूंचा मोड केला असताहि, हिंदु त्याचा सूड घेण्याचं सोडून बाअीलवेडे होअून घरींच दडून बसले असं जग जगी आणि मन मनीं ह्मणतांना मला अैकूं येअील तर त्या लाजेनं ह्याच डोळयांतून रक्ताचे अश्रु वहातील ! तुह्मांला लढाअीवर जाण्याचा हंसता निरोप आह्मा अबलाना देतां आला नाहीं तर, हिंदुवीरांनो, तुह्मां प्रबलांना तो मिळेल तसा घेतां तरी आलाच पाहिजे ! शतद्रु सिंधूंचा अफाट जलौघ ओलांडणारे तुह्मीं वीर—अबलेच्या आंसवांची ही सुतासारखी हळुवार जलधार तुमची वाट काय अडवणार ! ओलांडा ते हृदयाचें पळीभर पाणी, नि हिंदुवीरांनो जा ! भाअूंचा सूड घ्यायला, पानपतचा सूड घ्यायला, हिंदूंचा सूड घ्यायला जा ! जा !

**यशवंतराव**:—वा, सखे, वा ! आतां मात्र तुझ्या ताअीची, वीरांगनेची, खरी प्रतिनिधि शोभलीस ! ( कुचाची नौबद मधून मधून झडूं लागते. ) ही पहा कुचाची नौबद झडूं लागली. आतां गेलंच पाहिजे आह्माला ! ये, सखे ये, नि सोड आतां ! जातो अं !

**सुशीला**:—थांबा, ही पंचारती तेवढी ओंवाळून झाले कीं जा ! ( पंचारती ओंवाळीत ) हं, यावं आता ! सख्या पण लढाअीवर देखील शक्यतों जिवास जपावं अं ! स्वारीच्या टप्प्या टप्प्यांतून मला बातमी सारखी धाडीत

जायचं बरं का! थांबा, पायांचा अंगारा तेवढा घेऊं द्यावा! आणि आतां तुमच्या सुशीलेचा शेवटचा

**हा नमस्कार घ्यावा! अहो पतिदेवा।**
**दासीवरती असे तसाची लोभ असो द्यावा। नमस्कार घ्यावा॥**
**हा नमस्कार घ्यावा। प्रिया पतिदेवा॥ १॥**
**पाठवण करी आठवण धरी स्नेह न विसरावा॥ प्रिया पतिदेवा॥२॥**
**वीरश्रीचा वीरा करु तव वीरभद्र हेवा॥ पूज्य पतिदेवा॥ ४॥**
**बघा न मागुति पुढचा पुढती पाय रणीं ठेवा॥ पूज्य पतिदेवा॥ ५॥**
**हिमालयावरि हिंदुध्वज हा वीरा रोंवावा॥ अहो पतिदेवा॥ ६॥**
**वाण सतीचें घेऊनि पाहिन वाट येशि केव्हां॥ प्रिया पतिदेवा॥७॥**
**अश्रूंमाजी निरोप देतें अश्रु पुसुनि घ्यावा॥ प्रिया पतिदेवा॥ ८॥**
**हा नमस्कार घ्यावा! अहो पतिदेवा॥**

( पुनः नगारे होतात. यशवंतराव हातानें खुणवीत निघून जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

[ स्वारीच्या कुचाची पहिली नौबत वाजत आहे. मध्यभागीं उभ्या असलेल्या ध्वजाजवळ येऊन शिंगाडे रणशिंग वाजवून जातात तोंच माधवराव, महादजी, विनीवाले, होळकर, यशवंतराव प्रभृति सरदारासह येतात. ]

**माधवराव**:—चोपदार, पहांट फुटतांच स्वारीच्या प्रस्थानाचा पहिला दुंदुभी मघां झडल्याबरोबर सारी छावणी खडबडून उठून सज्ज होत आहे ना? ती पहिली पाहणी करून आलेत?

**चोपदार**:—हां जी सरकार! उत्तर हिंदवर मराठी सैन्य चालून जाण्यासाठीं नुसतें तरवारलें आहे. कुचाची पहिली नौबद झडतांच एकाहून एक आगळे, कोणी दस हजारी, कोणी पांच हजारी, कोणी हजारी अशा पथकांचे सरदार, रणवेशानें फुरफुरत, मस्तकीं तुरे कलग्या, आंगीं कवचे, हातीं पट्टे, भाले, तरवारी, कंबरेस शैले कसून, रणशस्त्रें नि रणशृंगार कटितटीस चढवून

आपापल्या सैन्यांतून स्वारीची सिद्धता कडेकोट करवीत फिरूं लागला. अगणित अश्वारोही शिलेदार बिरुदें बांधून, बरच्या बिचवे बंदुका नीटनेटक्या सांवरून, शिरी फेंट्यांचे लफ्फे सोडून, घोड्यांचे पाठी जरीबादली पाखरा टाकून, पायी तोडर बांधून थयथय नाचणाऱ्या घोड्यांस थोपटीत अुभे आहेत. वर हौदे अंबाऱ्या, रत्नांच्या मुक्ताभरणी झालरी, गंडस्थली चित्रविचित्र आभरणें अशा थाटानें गजभार ठायी ठायी थाटत आहे. तोफखाना हजार हजार, जेजाला सुतरनाले, थोरली भांडी, कुणी दशघ्नी कुणी शतघ्नी, अेकूण हजार आवाज ऱ्हेकल्या गाड्यावर चढवून नोकझोक ठाकठीक करीत यंत्रव्यूह पसरीत आहे. पथकापथकाचे ध्वजधर भगव्या भरजरी अुंच अुंच ध्वजाचे फरारे सोडून आप-आपल्या ठायी अुभारीत आहेत. सिंधी, सोरटी वंजारी देशोदेशींचे सौदागर बोजे गल्ले दाणा बाधून अुंटें तट्टें बैल लादित आहेत, जिनबंदी करून बिनीवाले सरसावून आहेत, ताशे मर्फे नगारे नौबदी रणढोल रणशिंगें ठायी ठायी तुंबळ तुडुम गाजत वाजत आहेत. पायदळ, घोडदळ तोफखाना सरदार सैनिकसुद्धां अवघा दळभार अुत्तर हिंदवर चढून जाण्यास तय्वारला आहे. प्रत्येक मराठ्याचे अंगी वीरश्रीचें वारें, ह्रदीं पानपतचा सूड, हातीं पोलादाची धार संचरत, सळसळत, तळपत आहे!

**माधवराव**:—अुत्तम! आतां सरदार हो, आह्मी देव मस्तकीं धरून ही होड तर आरंभिली! अुत्तरहिंदवरच्या या स्वारीचें सेनापतिपद आह्मी आपले धुरंधर सरदार रामचंद्र गणेश कानडे यास दिलें आहे. स्वारीचा कारभार विसाजीपंत बिनीवाले पाहातील. आता ही एक लाख सेना सांगाति घ्या नि जा; अविधाचें कंदन करा जा! पानपत झुंजणें तर कठीण होतेंच, पण पानपतचा सूड झुंजणें अधिक कठीण आहे. पानपतपूर्वी अुत्तरहिंदमध्यें मराठ्याचा दरारा होता. पण मागें पानपतीं आमच्या सेना अुधळल्यामुळें आज साऱ्या अुत्तर हिंदमध्यें मराठ्यांस कोण मोजतो अशी धुंद माजली आहे. नजीबखान केवळ साप. वरवर तसाच मऊ, तसाच लवचिक, तसाच लपंडावी, पण दंशाचाहि तसाच विषारी! केव्हां निसटेल, केव्हां अुलटेल, नेम नाहीं. पानपतचा हाडवैरी तोच, नि बंगष नि हाफिज. त्याशी राजकारणी अनुकूल तरच मंत्रबळें कैचीत राखावा. पण अुपयोग संपताच छाटून साफ बुडवावा. शाह अबदालीस शीखाचा पेंच आहे पण तो जातीचा झुंजार, महासाहसी—

अटक अुतरून अकस्मात् विजेसारखा कडाडून कोसळण्यास प्रसंगीं सोडणार नाहीं. हे सारे अवघे पठाण रोहिले-अेक होअून झुंजू लागतात. त्यांतही पानपतचे वेळी नव्हता असा जो अेक नवीनच शत्रू आज मराठयांच्या विरुद्ध दिल्लीच्या राजकारणास खेळवू पहात आहे, त्या अिंग्रजाचाही त्यांस आतून पक्का पाठिंबा आहे. स्वतः बादशहाच आज अिंग्रजाचे आहारी पडू पाहतो. त्यास हरप्रयत्नें युक्तीनें वा शक्तीनें, अेकास अुठवून अेकास बसवून, अिंग्रजाचे हातून सोडवावा. तो त्याचे हाती राहिल्यास त्यास पुढें करून इंग्रज मराठयाविरुद्ध मोठें खूळ अुभारील, दिल्लींत शिरेल. अिंग्रज चढी लागला आहे. दिल्लींत प्रवेशल्यास अुखडणार नाहीं. तरीही अिंग्रज समयज्ञ. मराठयाचा अवघा दळभार निकरावर येतांच तो आज तरी रणी झुंजू येणार नाही. येवढयावर झुंजू आला तर झुंजावेंच. आतां जो समोर येअील त्याचे अेक घाव दोन तुकडे हाच बाणा! तो पहा शुक्राचा तारा. पानपती हाणामारा करीत भाअू तलवार अुपसून गिलच्यात पायअुतारा शिरले तेव्हा त्याचा क्रोधाचा नेत्र जसा तळपत होता तसा तळपत आहे—टक लावून तुह्माकडे पाहात आहे. हा पहा हिंदुपदपाच्छाअीचा हिंदुध्वज! याचेच सन्मान संरक्षणार्थ भाअू पानपती पडले! आज मराठयाच्या बखरीचें शेवटचें वाक्य 'मराठे पानपतची लढाई हरले' हें आहे. हें शेवटचें वाक्य राहिलें तर, हिंदूची जी जी पिढी तें वाचील तिचें तिचें तोंड काळेंठिक्कर पडेल! मान मुसलमानापुढें लज्जेनें वाकेल! तरी आज असे लढा, पानपतचें असे अुट्टे काढा, मोंगली सत्ता नित्याची अशी पालथी घाला कीं, बखरकारास पुनः पुढें लिहिणें भाग पडावें कीं, 'मराठे पानपतची लढाई हरले! पण मराठयानी शेवटी, दिल्लीची मोंगल बादशाही धुळीस मिळवून, पानपतचें युद्ध जिंकलें!' हें यश संपादू तरच तुह्मी आह्मीं शिवछत्रपतींचे वंशज! ह्या आशेनें, त्या छत्रपतींचा, हा हिंदुध्वज, आह्मीं आज तुमचे हातीं देतों! आता याची लाज तुह्मास!

(सारे सरदार खड्गें अुपसून 'हरहर महादेव' गर्जत त्यास खड्गाही वंदना देतात.)

**बिनीवालेः**—आह्मां साऱ्या सरदाराचा मानस हाच कीं, पानपतीं ज्यांनीं ज्यांनीं मराठयांविरुद्ध डोकें अुचललें, घातपात केला, त्याचें त्यांचे पारिपत्य पुरतेपणीं होऊन सारी मोंगल बादशाही हिंदुमय करून भाऊंची अतृप्त अिच्छा

पुरवूं, पानपतचा सूड घेअू–तरच दक्षिणेंत परतूं! छत्रपतींचे आशिर्वाद शिरीं, श्रीमंतांची विरश्री अंगीं, आणि हिंदुपदपाच्छाअीचा हा भगवा जरीपटका हातीं असल्यावर अटक देखील आम्हांस अटक करूं शकणार नाहीं. सुभेदार मल्हारराव होळकर म्हणतच असत कीं अेक वेळ हिंदूंचे मुसलमान होअू पण अटक अुतरून थेट रुमशामवर चालून जाऊं!

**यशवंतराव:**—पण मी म्हणतों कीं अटक उतरण्याचें सुभेदारांचे भविष्य खरें करूनही अटक अुतरताच हिंदूंचें मुसलमान होण्याचे सुभेदारांचे भयही खोटें ठरवूं! जर रूमशामच्या अहिंदूंना अहिंदू राहूनही सिंधूची अटक ओलांडून हिंदुस्थानांत येतां येतें तर हिंदूंनाही, हिंदु राहूनही, अटक ओलांडून रूमशामवर चालून जातां आलेच पाहिजे. हिंदुत्वाच्या पायात आमच्याच हस्तें आम्हीं ठोकलेली ही अटकेच्या अटकेची, ही सिंधुबंदीची, ही रोटीबंदीची बेडीच आम्ही ताडकन तोडूं तर आम्हीं हिंदूही राहूं आणि रूमशामवरही चालून जाऊं!

॥ सबभू है गौपालकी उसमे अटक कहां ॥ जिसके मनमे अटक है वोही अटक रहा ॥

**माधवराव:**—भले वीर भले! अशाच निष्ठेनें जा, झुंजा! याउपर घडेल ते यशापयश ओश्वराधीन. तो बोल तुम्हाआम्हांस नाहीं. उचला तर मग हा पैजेचा विडा, गर्जा हरहर महादेव आणि घ्या आमचा निरोप!

(नगारे, शिंगे वाजूं लागतात, सरदार विडे घेऊन हरहर महादेव गर्जेतात. पडदा पडतो।)

अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

—०००—

## प्रवेश १ ला

[ नजीबखान, हाफीज रहमत, अहंमदखान बंगष दिल्लीचे बादशाही खलबतखान्यांत बसले आहेत. ]

**नजीबखानः**—रोहिलोंके मातबर सरदार हाफीज रहमतखानजी, और पठाणी सरदारोंके सिरताज अहंमदखान बंगषसाहेब! पानपतच्या धुमाकुळींत भाऊसाहेब पेशवे यांचे भयानें दिल्लीहून शाहअलम बादशाहा पळून गेले ते अजून आज दहा वर्षे होत आली तरी अलाहाबादेसच आहेत. पानपतला मराठ्याची जबरदस्त नामुस्कि होऊन अहमदशहा अबदाली फते पावले, पण त्यांसहि दिल्लीचा बंदोबस्त करवला नाही. तरीहि मोंगल बादशाहीच्या या सेवकानें समशेरीच्या बळानें बादशहांच्या गैरहजिरींतहि आजवर दिल्लीवर अिस्लामी झेंडा कसाबसा फडकत ठेवला. पण त्या मराठ्यानीं पानपतच्या पराभवासहि पचवून नि पुनः शिरजोर होऊन आज अुत्तर हिंदवर स्वारी चढविली आहे. त्यांचे वाटेंत मी जाटास आडवे घातलेच आहे पण तिकडे अलाहाबादेकडे बादशाहा घाबरून जाऊन मराठयांचेंच साह्य घेऊं पहातात! जर का बादशहा पुन्हां मराठ्यांचा हाती पडला तर पानपतला मराठ्याचें हाडवैर ज्या तुह्मीं आह्मीं संपादिलें त्या साऱ्यांचा सत्यानाश होअील! हें भयंकर संकट टळावें कसें तें तुह्मींच सांगा!

**अहंमदखानः**—अै अिस्लामी सलतनके मातबर सरदार, मोगली तक्तके अुपर बादशाहोंको चढानें अुतारनेवाले हिंमत बहादर सरदार नजीबखानसाहेब मराठोंके नामसे आप अितने क्यों घबराते हो! मेरे पंचास हजार पठान जबतक जीते है तबतक मरहट्टे किस चिडियेका नाम है! यह दिल्लीका मोगल बादशाहा शहाअलम यादि नामर्दगीसे इस वख्त मराठोंको मिल जायेगा तो मै सचमुच बाबरके मोगल खानदानको हटाके अिस दिल्लीके अिस्लामी तख्तपर पठाणोंके सरताज शाह अबदालीको बिठवायेंगा—नहि तो मै खुदही अपनी पठाणी बादशाहत कायम करूंगा! पानपत पठाणोंनेही जीता है यह बादशाहत असलमें तो पठाणोंकीहि है!

**हाफीज रह्मतः**—खामोश! बंगषखान यह रोहिलोंकी समशेर मेरे हातमे जबतक चमकती है तबतक तो दिल्ली में होअेगी तो रोहिलोंकीहि बादशाहत होअींगी, पठाणोंकी नहीं! पानपतकी लढाअी हम रोहिलोंने जीती–पठाणोंने नही!

**नजीबखानः**—पानपतची लढाअी खरोखर सांगायचें तर अजून कोणीच जिंकली नाही! पानपतचा सूड अुगवण्याची धमक जोंवर मराठ्यात आहे तोंवर पानपत तुह्मीं जिंकलें नाही. असलिये अब, सबमच्चे दीनदार मुस्लीम बहादरों, आपसके झगडे छोडकर पहिले अिस काफरोंके जोरको कुचल लेना चाहिये!

**बंगषः**—अैसीही बात है तो मै आपको अेक साफसाफ सवाल पूछताहूं. आपण मराठ्याच्या साह्यास स्वतःची अेक लहानशी फौज धाडली आहे हें खरें का? मराठ्यानी आपणास मागें जिवंत धरून सोडलें तेंव्हापासून आपण मराठ्यांची धास्ती खाल्ली आणि ह्मणूनच आता आंतून त्याच्याशी होळकराच्या वतीनें सूत बांधून प्रसंगी स्वतःचा जीव वाचवूं पहात आहा अशी आह्मांस जबरदस्त शंका येत आहे! आपला कपटी स्वभाव मश्हूर आहे!

**नजीबखानः**—मेरे प्यारे बंगषखानजी, मी कपट केलें असलें तरी तें अिस्लामच्या शत्रूंशीच होय! होळकराचा मीं मानसपुत्र ह्मणवून घेतलें ह्मणूनच पूर्वी होळकरास सपशेल तोंडघशीं पाडूं शकलों. तशीच मीही अेक मूठभर लष्करी फौज मित्र ह्मणून मराठ्यांचे साह्यास धाडली असल्यानें ते असावधपणेंच मजकडे येतील आणि मागें जसा मी दत्ताजी शिंद्यास कोंडला तसाच त्या मराठी फौजांसहि चुचकारित, कोल्हा सिंहाचे गुहेंत अचानक सोडावा, तसें तुमच्या कैचीत कुठेंतरी अचानक आणून सोडीन! राहिला बादशहाचा प्रश्न, पण ते मराठ्यांस बोलावीत आहेत हें कळताच मी अिंग्रजास अुठविलें. त्यांनी बादशहास मराठ्यांविरुद्ध साह्य देतों ह्मणून सागताच सुजाअुद्दौलेहि धीर धरूं लागले. तेंव्हां जाटांनीं मराठ्यांस अडवलें आहे तोंच तुह्मीं फौजबंद होअून यावें. तिकडून अबदाली, अिथें आपण, खालून बादशहास घेअून सुजा नि अिंग्रज, असे चढून येतांच मराठे चटणीलादेखील वांट्यास येणार नाहींत.

**बंगषखानः**—शाबास है, अै मसलती मातबर, शाबास! बस. मै मेरी पचास हजार पठानोकी फौज अभिके अभी दोआबमे जाके खडीकर देताहूं!

मरहट्टे दिल्लीमे काफरशाही कायम करना मंगते है! मैं अुनको जल्दीही बता-ऊंगा की अिस्लामी शेर की गुहा है यह दिल्ली—

**हाफिजः**—जिसके सामने आतेही मरहट्टे बन जायेंगे बिल्ली!! मराठे बुतपरस्त काफर! क्या अिस फत्त को पूजनेवालोंको, कभीभी दीनदार बुतशिकन मुस्लीमोंके अुपर फत्तेह मिल सकती है!

**नजीबखानः**—कभी नही! अब जायीये, दीने अिस्लाम के महावीरों, आपापनी फौजें सजधजाके अिस मुस्लीम सलतनतके बचावकेलिये बिजलीके वेगसे दौड आयीये, जायीये!

---

## प्रवेश २ रा.

**नजीबखानः**—( स्वगत ) शाह अबदालीची अितकी पायधरणी केली पण अजून त्याचें कांहीच अुत्तर येत नाहीं. अेक वेळ काहीच अुत्तर आलें नाही तरी चिंता नाही. अबदाली येणारयेणार अशी नुसती भुमका जरी सारखी अुठत राहिली तरी मराठे वचकून राहतील, पण जर का अबदाली येतच नाहीत असें अुत्तर आलें तर मात्र प्रसंग कठीण गुदरणार! जाटांनी दिल्लीच्या वाटेंत आडवें येअून मराठ्यांशीं झुंज ठाणली आहे तोंच—

**चोपदारः**—( प्रवेशून ) सरदारसाहेब! मराठ्याच्या छावणीतून पक्की बातमी आली आहे कीं शाह अबदालींनी आपण मराठ्याशीं मित्रत्वानेंच वागणार आणि झालेला संधि मोडणार नाहीं असें आश्वासन मराठ्याचे सर सेनापति कानडे यास धाडलें आहे.

**नजीबखानः**—जाव! मराठे बडे सैतान है! हमको नाअुमेद करनेके लिये अैसी झूटी बाजारगप्प हरवख्त अुडाते रहते है!

**चोपदारः**—और आपकोभी शाह अबदालीके तरफसे यह सरकारी लिफाफा आया है. ( पत्र देतो नि जातो. )

**नजीबखानः**—( पत्र वाचून ) क्या? अबदालीसरीखा शहानशहाभी मरे-ठोंसे सचमुच डरगया! दिल्लीच्या राजकारणांत मराठे नि तुह्मीं आपलें कायतें पाहून घ्या; त्याप्रकरणीं काबूलचें सरकार मराठ्यांशीं वैर करीत नाहीं असें हें

मला साफ अुत्तर अबदालीनें धाडावें ऑं ! मराठ्यांस दिल्ली मोकळी करून द्यायची होती तर दिल्लीच्या राजकारणांत पानपतचे वेळीं तरी या घमेंडखोर अबदालीनें नाक कां खुपसलें ! आणि आह्मांस मराठ्यांचे हाडवैरी बनवून आतां असें साफ तोंडघशीं कां पाडलें ! अच्छा, जाट कांहीं झालें तरी आणखी तीन चार महिने मराठ्यांस गुंतवून ठेवीलच. तोंवर अिंग्रजांसह बादशहास दिल्लीस आणावें. बगंष नि हाफिज, त्यांच्या प्रचंड फौजांनिशीं तोंवर येतीलच.

**चोपदारः**—( प्रवेशून ) हुजूर ! बजारमें तमाम मुसलमान बडी खुषी कर रहे है ! जाटोंने किसी बडी लढाअीमे मरोठोंको नेस्तनाबूद किया अैसी अफवा बडी जोरसे फैली है !

**नजीब०:**—शाबास ! जाव ! जाट सचमुज बडा बहादूर है ! आता मराठ्यांशीं मीं अजून चालविलेलें मैत्रीचें सोंग सोडून अुघड अुघड जाटास मिळावें हेंच अुत्तम ! बाजारी ह्मणून ज्या बातमीस आह्मीं ह्मणतों ती पुष्कळदां सरकारी बातमीहूनाहि येण्यांत आधिक चपळ आाणि माहितीनें अधिक भरपूर असते ! जाटांनीं मराठ्यांचा मोड केला असलाच पाहिजे ! ही बाजार बातमी खरी असलीच पाहिजे !

**दु० चोपदारः**—हुजूर, बाजारांत हिंदुलोक ह्मणतात, कोणच्या तरी मोठ्या लढाअींत मराठ्यांनीं जाटांचा पुरता मोड केला !

**नजीब०:**—अै गवार ! बाजारांत पांचशें सच्च्या झूट्या खबरी पांच पळांत बोकाळून जातात ! ही खबर खरी कीं खोटी याचा नीट शोध केलास ? नाहीना ! तों अैं कमबख्त जाव और पहिले वह दर्याफत करो. बाजारगप्पांवर आह्मीं सहसा विश्वास ठेवीत नाहीं ! जाव ! ( तो जातो. )

**प० चोपदारः**—( पुनः प्रवेशून ) हुजुरके सेवामे आग्रेसे यह सरकारी लखोटा आया है ! ( पत्र देऊन जातो. )

**नजीब०:**—( वाचून ) या अल्ला ! या खुदा ! अितक्या धडाक्यानं मराठ्यांनीं जाटांच्या त्या जबरदस्त फौजेचा पुरता फन्ना पाडला तरी कसा ! क्या ? खुद नवलसिंग जाटच मराठ्यांचे हातीं पडला ? आणि मराठ्यांनीं दिल्लीवर ढाला फिरवल्या देखील ! अै नजीबखान ! अब तेरी जान ? तेरी जान अब मराठे नही छोडेंगे ! पळून जावें ? कुठें ? बंगषकडे ? पण पाठोपाठ मराठ्यांचे

शिकारी कुत्रे माझी कुतरओढ करतील तेव्हां कुठें लपूं?–दिल्ली लढवूं? अक्सर बेवकूफीकी बात! त्या मराठी फौजांच्या प्रचंड लोंढयापुढें दिल्लीची ही बाद-शाही नामर्द फौज गवताच्या काडीसारखी वांकून वाहून जाअील आणि पुनः लढतांना जर मीं सांपडलों तर भुक्कडांतील भुक्कड मराठाहि "पानपतचा सूड! पानपतचा सूड" गर्जत माझे राअी राअीअेवढे तुकडे करण्यास चुकणार नाहीं! अफसोस! अफसोस! अब दुसरा कुछ तरीका नहीं! अै नजीबखान!! अब जो तेरेको बचानी होगी तेरी जान, तो मरहट्टोंके पांवपर रख दे तेरी तरवार और तेरा म्यान! हां हां, होळकरांस अचानक शरण जावें. म्हणजे तो माझा शिरच्छेद तरी होअूं देणार नाहीं खास! आपण मित्र म्हणून मराठ्यांकडे धाड-लेल्या आपल्या फौजेचाच हा आंशिक जय आहे असं ढोंग करीत मराठ्यांस आपण होअून जाअून भेटावें. ते वर्दळीवर आल्यास साफ पाय धरावे. जिवा-वर आलें तें शरणाच्या शेंपटीवर गेल्यास ठीकच! जगलो तर ह्या शरणाचा वचपा खुद्द माधवरावाच्या मरणानेंच काढीन!–अजूनहि काढीन! पण तें पुढचें पुढें!

---

## प्रवेश ३ रा.

[ महादजी शिंदे, बिनीवाले, तुकोजीराव होळकर, जाटाचे देशी छावणींत बसले आहेत. ]

**बिनीवाले:**—सरदार हो, पुण्याहून अुत्तर हिंदवर चालून आल्यास आपणांस अुणें पुरें वर्ष होत आलें. त्या अवधींत बुंदेलखंडांत आपले सर सेना-पति कानडे यांनीं तेथील बंडावा मोडला. शिंद्यानीं जयपूर जोधपुरापर्यंत रज-पुतांची बंडाळी मोडून थकलेली साठ लक्ष खंडणी घेतली. तुकोजीराव, आपण बुंदीकोट्याकडील व्यवस्था लावून खंडणीची बारा लाख बाकी देणें त्यांस भाग पाडलेंत. पावसाळ्यांत अितकें कार्य अुरकून आमच्या साऱ्या सेना पुन्हां अेकदां अेकत्र होअून जाटांशीं भिडल्या. जाट झुंजार, लढलेहि बहुत. जाटांकडे फ्रेंच जनरल माडेक आणि सुमरू! त्यांचीं कवायती पालटणें केवळ अजिंक्य पण त्यांस चोपून तुम्ही आज जाटास पुराता मोडलात. आतां शरण आलेले जाटांचे अधिपति नवलसिंग जाट स्वतःच आपले भेटीस येणार. सर सेनापति

कानड्यांची आज्ञा अशी आहे कीं, त्यांस पराजयाचे दुःखाचा विसर पडावा अशा ममतेनें आपले करून घ्यावे. हे रावराजे यशवंतराव आलेच त्यांना घेऊन!

( अधोवदन नवलसिंगास यशवंतराव घेअून येतातः सर्व अुत्थान येतात. )

**बिनीवाले**:—*यावें! वीरवर नवलसिंगजी असे अिकडे आमच्या शेजारी* गावें. असे अधोवदन का? तुह्मीं जाट हिंदु, आह्मीं हिंदु. जाट आमचे भाअी-बंद आहेत. आपणा हिंदूंशी लढावें लागलें याची लाज आह्मासहि आहेच. वास्तविक हिंदुस्थान हिंदुमय करून स्वधर्म राज्य स्थापावें हा आमचा पूर्वा-पार मनोदय. तीन पिढ्या मराठे त्यासाठीं यवनांशीं झुंजत आले. पण सुरजमल जाटांनीं पानपत प्रसंगीं शपथक्रिया मोडून नि भाअुसाहेबांस यवनाचे तोंडी अेकटे सोडून आपण निघून गेले ही गोष्ट अनुचित झाली. पण त्यायोगें सुरजमल्ल तरी वाचले का? नाहीं! ज्या नजीबखानाचे नादी लागून सुरज-मल्लानीं मराठ्यांचा विश्वासघात केला, त्याच नजीबखानानें मराठे मोडताच त्या तुमच्या सुरजमल्लानाहि अेकटें गाठून शेवटीं ठार मारलें! आता झालें तें झालें. सुरजमल्लानीं रणांगणात आह्मास सोडलें तरी पानपत बुडतांच सुरज-मल्लांनीं जातीनें पानपताहून परत फिरलेल्या मराठ्याचा बहुत परामर्ष घेतला. तें अुपकारहि आह्मी स्मरून आहोंत. दुर्दैवानें आजवर लढलों, पण आता यापुढें तरी आपणा साऱ्या हिंदूंनीं हिंदुपदपादशाहीच्या कार्यां आपलेंच कार्य समजून सहकार्य करावें हेंच अुचित.

**यशवंतराव**:—पण रजपूतादि हिंदूंनीं यवनी बादशहास आपल्या मुली-देखील देअून अुलट शिवाजी महाराजापासून आजवर मोंगलाच्या वतीनें मराठ्यांवरच राजे जयसिंगाप्रमाणें सतत स्वाऱ्याच चढवल्या, पानपतीं घात केला, यवन वांचवला. बंगालपासून सिंधपर्यंत साऱ्या हिंदूंत हिंदुस्थानात अेक-छत्री हिंदुराज्य करील असा अेकहि वीर अुरला नसता अेकट्या मराठ्यानीं तेवढें तें साहस केलें, हिंदुस्थानांत अेकछत्री हिंदुराज्य जवळजवळ स्थापीत आणलें, हें तर खोटें नाहीं? औरंगजेबी म्लेंच्छ बादशहांचे अंकित ह्मणवून घेण्यांत जी लाज आहे, तितकी तरी हिंदु छत्रपतींचे अंकित ह्मणवून घेण्यांत रजपूत जाटादिक हिंदूंना खचित खचित नाहीं! तेव्हां आतां झालें तें विसरून आपण आग्र्याचा किल्ला त्या साऱ्या प्रांतासुद्धां मराठ्यांचा मराठ्यांस परत द्यावा, पन्नास लक्ष रुपये खंडणी ह्मणून द्यावे आणि दिल्लीवर चालून

जाऊन मराठे अविंधांशीं लढत असतां मित्रभावानें, बंधुभावानें, हिंदुभावानें त्यांस निदान नुसता पाठिंबा द्यावा हेंच उचित !

॥ पद ७ ॥

**खलदमना । मानव । हितकर । जरि तुह्मि । करूं शकानाचि ॥**
**स्वधर्मराज्या । स्थापुनिया ते । करूं तरि आह्मां दयाचि ॥ खल ॥**

**नवलसिंगः**—ह्या साऱ्या अटी आह्मास मान्य आहेत. जाटाचा राजा श्रीमंत पेशवे सरकारांचा आजपासून उपकृत मित्र झाला !

**चोपदारः**—( प्रवेशून ) सरकार ! दिल्लीहून बादशाही लखोटा घेऊन कोणी मोठा मुसलमानी सरदार पायउतारा छावणींत आला असून कारभाऱ्याची भेट तात्काळ घेऊं इच्छितो.

**बिनीवालेः**—जा घेऊन ये त्याला. ( चोपदार जातो. ) मला वाटतें बादशहा मराठ्याकडे येणार होते त्या प्रकरणीं हा कोणी तरी निरोप्या आला असावा. ( नजीब प्रवेश करितांच ) कोण तुह्मी ? ( चमकून ) काय ? तुह्मी—

**नजीबखानः**—परम प्रतापी पेशवेबहादुरास सर्वस्वीं शरण रिघत असलेला ( गुढघे टेंकून ) हा त्याचा अपराधी नजीबखान !

**महादजीः**—कोण ? नजीबखान ? दत्ताजीस फसवून अंतर्वेदींत मारविणारा नजीबखान ? सुरजमल जाटास मारणारा नजीबखान ? अबदालीस बोलावून पानपतचा कट रचणारा मराठ्यांचा हाडवैरी नजीबखान ! आणि तूं शरणागत होऊन येतोस ? रडतोस ? छट्, छट्, जा, आलास तसाच परत जा आणि लढायला ये. आता कुठें आहे तुझा तो अबदाली ? त्याला मीळ जा ! तुला मराठ्याच्या पायांशीं आह्मीं आणणारच आहों, पण तें मरणाचे पाश फेंकून फरफटत ओढीत !—असें शरणागतीच्या ढालेखालीं अलगत झांकून नव्हे ! कुठें आहेत सर सेनापती कानडे ? याला इथल्याइथें ठार करण्याची आज्ञा मला लवकर द्या ! नाहींतर राजशिस्तीच्या करकच पायबंदास तोडून तुमच्या आज्ञेवाचून ही माझी तलवार या पाप्याचें हें शिशुपाली शीर भर राजसभेंत कापण्यास श्रीकृष्णाच्या सुदर्शनासारखी माझ्या हातांतून निसटेल—निसटलीच पहा ! ( नजीबखानास मारायला धांवतो तोंच होळकर आडवे येऊन )—

**तुकोजीराव होळ०ः**—हां ! हा ! महादजी ! शांत व्हा ! प्रथम मला तोडा नि मग या राजसभेच्या शिस्तीच्या पायबंदास !

**महादजी**:—तुकोजीराव ! मागें हा मायावी असाच मराठयांचे हातीं जिवंत सांपडला असतां असाच रडला ! तेव्हां मल्हारराव होळकरांनीं मानसपुत्र मानून पाठीशीं घातला आणि भोळ्या दादांनीं याला जिवंत सोडला पण तुमच्या आमच्या अंत:पुराचीदेखील कुतरओढ करण्यास पुढें हा पापी चुकला नाहीं, हें विसरलांत वाटतें ? याचा वेष तुह्मांस बगळ्या साधूसारखा पांढरा स्वच्छ दिसत असेल, नाहीं ? पण मला पानपतीं पडलेल्या अेक लाख मराठयांच्या रक्तांत भिजून तो लालभडक झालेला दिसत आहे ! पानपत ! छे, मीं याला छाटणार--प्रत्यक्ष पेशवे आडवे आले तरी—

**बिनीवाले**:—महादजी ! सरदार! शिंदे ! माझ्या शब्दासाठीं ह्मणून तरी—क्षणक्षर मागें घ्या ! तलवार म्यान करा ! हा आतां लगेच पळून तर जात नाहींना ? तो काय ह्मणतो तें अैकून मग त्याचें पारिपत्य रीतसर काय करायचें तें करूंच !

**महादजी**:—निरुपाय ! निरुपाय ! रे नजीब, प्रत्यक्ष अैरावताच्या गजचर्माची ढाल करून जरीं तूं येतास तरी तीदेखील अेका फटकाऱ्यासरशी फाडून ही मराठयांची सूडाची तलवार तुझें शीर छाटून टाकती. पण या शरणागतीची ढाल घेऊन तूं आलास ! तीवर ती सूडाची तलवारदेखील बोंथट झाली ! तुला ही शरणागतीची अभेद्य ढाल कुठं सांपडली ? बहुधा होळकरांच्या शस्त्रागारांतूनच ती तुला गुपचुप पुरविण्यांत आली असावी ! तूं मल्हाररावांचा मानसपुत्र ना ! अखिल हिंदूंत मानसपुत्र होण्याच्या योग्यतेचा हिंदु होळकरांस सांपडत नाहींसें दिसतें ! ह्मणून मानसपुत्र तेवढा मुसलमानांतूनच निवडण्याची होळकरशाहींत परंपराच पडली असावी !

**तुकोजीराव**:—पाटिलबुवा ! तुह्मीं संतापाचे भरांत बेशुद्ध झालां आहांत. पण तुमचा तो संताप महादजीसारख्या मराठया वीराला साजेल असाच असल्यानें, तुमच्या दुरुत्तरांकडे दुर्लक्ष करून आह्मीं तुमचें कौतुकच करतों. नजीबखान तुह्मीं मराठयांशीं झुंजणार होतांना ?

**नजीबखान**:—झुंजायचें तेव्हां झुंजलोंहि ! पण त्याविषयीं मराठ्यांनीं मला पानपतीं मारून अुगविला असता त्याहून अधिक भयंकर सूड आज पाय चाटणाऱ्या कुत्र्यासारखा मला धिक्कारून उगविला आहे ! आतां झालें हें पुरे समजून आह्मांस पदरीं घ्यावें ! शरणांगतास मराठे सर्वदा औदार्यानेच वागवितात हा त्यांचा पूर्वापार लौकिक आहे !

**बिनीवाले**:—नाहीं, नजीबखान! शूरास आणि शंढास, सच्चास आणि लुच्चास—तो शरणागत ह्मणूनच—सारख्याच औदार्यानें वागविणाऱ्या राजपुती भोंगळसुतीपणाचा लौकिक ह्या आह्मीं, लौकिकास्पद नव्हे तर लज्जास्पदच समजतों! शूर आणि सच्चा शरणागतास आह्मी कसे सन्मानतों तें अिकडे पहा—हे नवलसिंग जाट! क्रूर आणि लुच्चा शरणागतास कसे वागवतों तें तो नजीबखान अुभा आहे तिकडे—स्वतःकडे पहा! अेकाच वेळचीं हीं दोन्हीं दृश्यें मराठ्यांच्या धोरणाच्या दोन्ही बाजू अेकत्रच दाखवितील!

**नजीबखानः**—नजीब यापुढें मराठ्यांशीं सच्चाअीनें वागतो कीं लुच्चाअीनें, तें त्याच्या कृत्यावरूनच जर कळलें तर मग तरी तो औदार्यास पात्र ठरेल ना? मराठ्यांच्या सर सेनापतींचे हातीं मीं माझी सारी फौज सोंपवून देतों, दिल्ली मराठ्यांस मोकळी सोडतों, माझे हातीं असलेला अंतर्वेदीतील सारा प्रदेश मराठ्यांस देतों आणि अिंग्रजांनीं पाठीशीं घातलेल्या बादशहांसहि फोडून आणून मराठ्यांचे हवाली करितों! पण जीवदान द्यावें! झाला हा करार? ठीक! आता आह्मीं मागचे पायीं दिल्लीस जातों नि फौजा आणि दिल्लीच्या किल्ल्या घेअून येतों. जाअू आह्मीं परत?

**बिनीवाले**:—तुह्मीं परत जाणार? नजीब! आता मराठी छावणींतून परत गेलें तर तुमचें प्रेत काय तें जाईल. नजीब, तुह्मीं मराठ्यांचे बंदीवान झालां आहां! तुह्मांस आमच्या सैन्यांतच बंदीस्त रहावें लागेल. तुह्मीं आतांच केलेल्या कराराप्रमाणें जर न वर्ताल, तर तुमचा तत्काल शिरच्छेदच केला जाअील! जा, रावराजे यशवंतराव! नजीबला बंदीवान करून पक्क्या बंदोबस्तांत ठेवा जा! आह्मींहि आतांच सर सेनापती कानडे यांजकडे जाअून या प्रकरणीं त्यांची काय आज्ञा, तें विचारतों. बस, सरदारहो, आतां अेकदम दिल्लीवरच चढून चलवयाचें! दिल्ली मोकळी झाली; कुऱ्हाडीचें काम सुईनें झालें!

(सर्व अुठतात. नजीबला यशवंतराव शिपायांचे हातीं देतात.

पडदा पडतो.)

## प्रवेश ४ था.

**कोंडण्णा:**—लोक ह्मणतात ' परमेश्वर तारी त्याला कोण मारी ' ! मीं ह्मणतों पंचांग तारी त्याला कोण मारी ' ! माधवराव पेशव्यांनीं मला मरणीं मारण्याकरितां ह्मणून लढाअीवर धाडला; पण या पंचांगाच्या प्रतापानं माझे पंचप्राण पेशव्यांच्या स्वयंपाक घरांत जितके सुरक्षित नि चैनीत होते, तितकेच या स्वारीत पण आहेत. पेशव्यांच्या वाड्यांतील बायका माणसं नसतील अितका या स्वारीतील झाडून सारा सरदार नि सैनिक ज्योतिष भोळा आहे. जो तो माझी कुंडली पहा, माझा हात पहा, ह्मणून सारखी माझी मनधरणी करीत असतो. मी लढाअींत मेलों तर ते लढाअींत कधीं मरणार तें भविष्य सांगण्यास कोणीच मोठा ज्योतिषी अुरणार नाहीं, ही गोष्ट भविष्य वर्तविल्यावाचूनहि सार्‍यास समजतेसें दिसतं. अशा सगळ्याच्या वशिल्यांच्या बळानं मी सैन्याच्या पिच्छाडीस पंचांग चाळीत सुरक्षित पडलेला असतों ! लढाअींत आघाडीस जोंवर जय मिळत आहे तोंवर पिच्छाडी शनवारवाड्याअितकीच निर्भय असणार. बरं, जर क्वचित् पराजय होअून अघाडी अुधळलीच तर त्या संकटाचीहि आता मला भीति नाहीं. कारण मला सैनिक झाल्यापासून तलवार जरी चालवतां येत नसली तरी घोडा असा चालवितां येतो की यंव ! लढाअींत घोड्याचा खरा अुपयोग जर केव्हां असेल तर तो पळ काढण्याचे वेळींच असतो. आमच्या मल्हारबा होळकराचा तर बाणाच होता तो ! पानपतला लढाअी बिघडून भाअू पाय अुतारा होतांच मल्हारबांनीं पानपतीं घोड्यावर जी माड ठोकली ती सगळ्याचे आधीं थेट पुणें गांठीतों चळूं दिली नाहीं. खरा खंदा स्वार तो ! बरं, मी पिछाडीवरच राहतों ह्मणून पानपतचा सूड घेण्याचें प्रत्येक जातिवंत मराठ्याचें जें खरें कर्तव्य, तेंहि माझ्या वांट्यापुरतें पार पाडण्यांत कांहीं मीं मुळींच आळस करीत नाहीं. पानपतला शत्रूनीं मराठ्याचे प्राण घेतले नि लूट केली—या दोन गोष्टींचा सूड ह्मणजे पानपतचा सूड ? पैकी मराठी प्राणांचा सूड शत्रूंचे प्राण घेण्याचे तें अघाडीचें सैन्य अुगवतेंच आहे. अुरला मराठ्यांच्या लुटीचा सूड; त्यासाठीं मीं नि या स्वारीच्या स्वयंपाक घराचा मानकरी आमचा घोंडण्णा असे दोघे प्रत्येक लढाअी संपताच रात्रीं बेरात्री त्या त्या रणक्षेत्रावर नि त्याच्या वाटेवर जाअून नि शत्रूचा मुडदान् मुडदा अुलथापालथा घालून, सोनें-मोतीं—वस्त्रें, जें गवसेल तें लुटून अघाडीच्या

सैन्यानें अर्धाच सोडलेला पानपतचा सूड पुरापूर घेऊन सोडतों! आं? हें पहा कोण्या शत्रूचें गांठोडें या निर्जन रानाच्या आड वाटेवरच पडलें आहे! पण आजूबाजूस तर कोणी नाही? नाहींतर ही चोरी होईल. (पाहून) छट् कोणी नाहीं. तेव्हां ही लूटच आहे! (तलवार उपसून) हर हर महादेव! पानपतचा सूड! (तलवारीनें गाठोड्यावर वार करून). बस्स. आतां अगदी रणधर्माच्या शिस्तवार अधिकारानेंच हें गाठोडें माझें झालें. पण असें सोडूं नये. मुहूर्त पहावा. (पंचाग पाहून) शुभ वेळा पण दहा पांच पळेंच आहे तेव्हा झटपट पळवलें पाहिजे. जयदेवा! (गांठोडें सोडीत) अरे वा! डागिने! नथ–मोत्याची माळा; जडावाचे गोट, हार, सरी!! लहंगा, ओढणी!–हीं वसनें मात्र फाटकी जुनाटच दिसतात हो! पण अरे कमरपट्टा! वा! (तो गांठोडें पहात आहे तोंच दोन तीन जाट मागून हळूंच येऊन पहातात.)

पहिला जाट:—(कुजबुजत) अबे रामप्रसाद! कुअी पक्का भुक्कड मरेठा देखनेमें आता है यह आदमी! आपल्या टिपऱ्यांच्या नाचांतील त्या पोरास द्यावयाच्या राधेच्या सोंगाचा हा साज बांधून जें गाठोडें या झाडाखालीं ठेऊन आपण पाणी प्यायला ओढ्यावर गेलों ना, तें तो चोरीत आहे! हाः हाः हाः! त्याची ती बाजूस पडलेली तलवार तेवढी लांबवूं नि मग आपणच या भुक्कडास लुटून फस्त करूं या! (हळूच तलवार पळवून) अे! कौन है! चोर! मरेठी चोर! ठैरो! तुला जाटाचा पण हात दाखवितों थांब!

कोंडण्णा:—(भीतभीत) जी हां! दाखवावा, जाटाचा हात दाखवावाच. मी अेक नामांकित ज्योतिषी आहें हें बरोबर ओळखलेंत. सगळं भूत भविष्य फुकट धमार्थ सांगतों. पाहूं, हात पाहूं!

जाट २:– दाखीव रे हात त्याला, दाखीव, दाखीव!(कोंडण्णास बदडतात) चूप! रडशील ओरडशील तर शीरच छाटून टाकूं! अुतर तो तुझ्या गळ्यांतील कंठा, तीं कडीं, त्या आंगठ्या नि त्याचीं अुचीं वस्त्रें पण घ्या काढून! हं आतां त्याला ह्याच झाडाला बांधू या. शेंडी बांध पक्की, हात पण. अस्सा! हं दादा! आता जातों आह्मीं अं. रागाअूं नका!

कोंडण्णा:– छे छे राग कसला! जाट मराठ्यांचें युद्धच चाललं आहे सध्या. तेव्हां तुह्मीं जाटांनी मला मराठ्याला लुटलंत तें साहजिकच आहे. पण,

हे सज्जन लुटारू हो, माझें वस्त्रहरण तरी करूं नका नि मला मोकळा सोडा. कांहीं धर्मयुद्धानें लढावें! पायां पडतों, अेवढें अैकाच.

जाट २:—धर्मयुद्ध होय? बरं तर, आतां असें करूं या. आह्मीं लुटलें तें आह्मी नेतों नि आमचें हें गांठोडें जें तुह्मीं लुटलें—त्या साऱ्या वस्तु—तुह्मीं ठेवा! घ्या! घ्या! घ्या हें सगळें! आता झालें? जपा अं नीट—त्यातील सोनें तेवढें पितळी आहे नि मोतीं तितकें बनावट! आणि हो; तुह्मांला मोकळें सोडायचें काम पण लवकरच होईल. या रानवाटेला दुसरें कोणी येत नाहीं. तरी देखील तुमच्या मासाच्या वासानें मध्यरात्री वाघोबा नक्की येअील. त्याला सागतों अं तुह्मांला मोकळे सोडून द्यायला. बरं, दादा, रामराम! रामराम!

(हंसत खिदळत जातात.)

कोंडण्णाः बापरे! वाघ येणार! यानीं वस्त्रहरण केलें—वाघ प्राणहरण करणार! आता या संकटी मला कोण हात देअील? हा माझा जोडीदार धोंडण्णा माझ्याबरोबरच या बाजूस शत्रूंच्या मुडद्यास लुटीत पानपतचा सूड अुगवीत होता—तो मला कचित् शोधित येअील, पण वस्त्रहरण झालेल्या त्या द्रौपदीसारखेंच या मला पाहताच तो दुष्ट दुर्योधन माझी अधिकच विटंबना माडील! भगवंता! कृष्णा! आता तूंच माझी लाज राखलीस तर राखशील. हो! हो! या संकटा माझी मावशी ह्मणत असे तो धावाच आता भक्तिभावानं ह्मणावा. तो धांवा ह्मणताच सगळीं संकटें टळतात असं ती मागे, अितकेंच नव्हें, तर चुलीत ओलीं लाकडें धुमसून त्रास देअूं लागलीं की मावशीनें तो धावा ह्मणताच तीं धडधड पेटूं लागत हें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे! तेव्हां, हे देवा, मी भक्तीनें करतों तोच धावा, नि माझी ती मावशीच आहे असें समजून मला तत्काळ पावा! (धावा बेगूर पण गळ्यावर ह्मणतो)

### धांवा

संकटि पडली द्रौपदी। पडलि द्रौपऽऽदी ॥ ये धांवत कृष्णा अधीं ॥
केलं माझं वस्त्रहरण। वस्त्रहरऽऽण ॥ मी येअि तुला शरण ॥
माझि बाअि वेणी ओढली। वेणि ओढऽऽली ॥ तडतडति केस वनमाली॥
मीं तरी बाअि अबला। बाअि अबऽऽला ॥ दुःशासन गांजी मला ॥

(तोंच पडद्यातून अग कोणाचे केंस तडतडताहेत?
अग कोण ग तूं? असा आवाज येतो.)

अुत्तरक्रिया



वेडीः—अगबाअी, हे कृष्ण आलेच धांवत ! [ पृष्ठ. ५१ ]

**कोंडण्णाः**—काय ? श्रीकृष्ण धांवत आले कीं काय ? या, देवा,-या !

**वेडीः**—( प्रवेशून ) अग कुठें आहेस तूं अबले ? कोणी ओढलीग तुझी वेणी ! ( त्यास पाहून ) हाः ! हाः ! हाः ! तूं का ती ? अगी माझी कोंडूताअी ती ! ( कुरवाळूं पहाते. )

**कोंडण्णाः**—( संतापून ) चल-हट ! कुत्या ! हीच कशी धडपडली अिथें!

**वेडीः**—कोंडूताअी ! तुमची का वस्त्रं त्या दुःशासनांनी हरण केली ? अहो पण हीं काय पडली आहेत अिथं ! वस्त्र नि डागिने देखील ! घालत्यें हो तुह्मांला ती पुन्हा ! ( त्याला तो जुना लहंगा नेसवते, ओढणीचा पदर घालते, नथ बुगडया, सरी वगैरे घालीत खो खो हंसते. ) कशी शोभते ही माझी कोंडूताअी ! पावला ना कृष्ण, पावला ना तुला ?

**कोंडण्णाः**—बाअी आता पुरे कर ही माझी विटंबना, नि सोडून दे मला. सोडलेंस तर मीं तुला मारणार नाही. भिअूं नकोस. आह्मी मराठे वीर स्त्रियांशीं लढत नसतों !

**वेडी**—खरं ना ! बरं सोडतें मी तुला. पण अेकदा तो तुझा धावा पुन्हा ह्मण ! आतां तुला तो जास्तच शोभेल ! खरंच सोडीन; अगदीं खरंच ! ह्मण—ह्मण.

**कोंडण्णाः**—पुन्हां धावा ह्मणतो !–( " संकटि पडली द्रौपदी, पडली० " अित्यादि. )

**वेडीः**—अुत्तम ! हाः हाः हाः ! फक्कड ! हाः हाः हाः ! खरोखर अमोघ धावा आहे हो तो ! अगबाई, हे कृष्ण आलेच धावत—जातें मी आपली ! हाः हाः हाः ! ( जाते. )

**धोंडण्णाः**—( प्रवेशून ) अरे हा कसला गलका होत आहे अिकडे ? कोण? कोंडण्णा ? वा ! वा ! जय देवबापा ! जय अर्धनारी नटेश्वरा !

**कोंडण्णाः**—धोंडया तुला देखील लाज वाटत नाहीना असें दांत काढून हंसायला ? सोड मला पहिल्यानें. अरे माझ्यावर तुटून पडलेल्या शत्रूंनीं माझा घात केला त्याची तुलाहि, माझ्या मुडदे लुटींतील साथीदारालाहि—लाज वाटायला हवी.

**धोंडण्णाः**—( त्याला सोडीत ) हाः हाः हाः अरे पण तुझ्या हातीं तलवार नव्हती का ? त्या चोरातील अेक दोघाना तरी लंबे का नाही केलंस ? किती भ्याड आहेस तूं !

**कोंडण्णाः—**( सुटतांच ) अरे मूर्खा, हातीं तलवार असती तर अब्दालीची तरी छाती होती का माझ्यासमोर यायची ! पण तलवार घेअून त्या भुरट्या चोरांशीं लढायला मीं तुझ्यासारखा कोणी यःकश्चित् स्वयंपाकी नव्हतों, समजलास ! ह्मणून मी ती खाली टाकून दिली नि त्यांनीं ती पळविली ! तसाच अेकादा बरोबरीचा सरदारी शत्रू येअूं दे–तसाच अेकादा बांका प्रसंग पडूं दे–ह्मणजे मग ती मराठ्याची जहागीरदारी तलवार कशी चालवतों तें तूंच पहाशील नि मला भ्याड ह्मटल्याची तुलाच लाज वाटेल.

**धोंडण्णा—**बरं बाबा ! आतां पहिल्यानें त्या झाडीआड चलून हें सोंग अुतर नि माझा हा दुसरा कपडा घाल. तिकडे सैन्यात परत जाण्यास फार अुशीर लागला नि तुझ्या माझ्या या समाअीक धंद्याचें बिंग फुटलें तर दोघांचेहि टाळकें शेकलें जाईल ! चल. ( जातात. )

---

## प्रवेश ५ वा

( स्थळः–पुणें; यशवंतरावांचे अंतःपूर. )

**सुशीलाः—**अगबाअी ! पण नंदिनी अजून का येत नाहीं ? माझ्या सख्याचं लढाअीवरचं पत्र आजच्या अुत्तर हिंदच्या डाकेंतून आलं की नाहीं तें पाहाण्याला मी हिला धाडलं; ही माझी जिवाची मैत्रीण ह्मणवते, नि तरी देखील किती अुशीर करते परत यायला ! सख्यावांचून शून्य झालेल्या या मंदिरात मीं अेकटी वेळ तरी किती काढूं ?

॥ पद ८ ॥

**स्वारि परतुनि वीर विजयी–दारिं येअिल तो कधीं ॥**
**अश्रु आणी कुशल पुसती भेट देअिल तो कधीं ॥**
**मदन विकला मदन मोहन मजासि आलिंगुनि हृदीं ॥**
**नवरसांच्या नवसुखांच्यां स्वर्गी नेअिल तो कधीं ॥**

अगबाअी ! आलीच ही ! पण हातांत कांहीं पत्र बित्र दिसत नाहीं तिच्या ! पोटकुळी खोंवून ठेवलं असेल मला फसवायला ! मोठी चावट आहे ती. का पत्र आलंच नाही ह्मणून सागणार आहे मला ? देवा, असा निरोप सागण्याची

पाळी नको आणूं तिच्यावर! ही जवळ येते तसतसं माझं ऊर कसं धडधडतं आहे! विरही प्रेम किती भ्याड, किती लाजाळू असतं! प्रियवृत्त ऐकायला तें जितकं आतुर असतं, तितकंच दूतींना तें विचारायला भितं, लाजतं! ही पहा आलीच आंत. आतां काय करूं? मला नाही विचारवत! चटकन पत्र नाहीं ह्मणून सांगेल नाहींतर! मी अशी आपली पाठमोरी होऊन हीं फुलंच खोवीत बसतें—जसं कांहीं तिला मीं पाहिलंच नाहीं! ह्मणजे आपण होऊन कायतें सांगेल.

**नंदिनीः**—( प्रवेशून ) काय, फुलं खोवणं चाललंय वाटतं! अग, आपण माळच ओवूं त्यांची थांब!

**सुशीलाः**—कोण? नंदिनी! रावराजांच्या चित्रासाठीं खरंच एक माळ गुंफूं अं! ( स्वगतः— ) पत्राचं कांहीं नांव काढते आहेका ही चावट.

**नंदिनीः**—दे ती परडी मला. ही फुलं केव्हा ग तोडलींस? कोणच्या ताटव्यांतली ग—मी लावलेल्या?

**सुशीलाः**—तें नाहीं माहीत मला. (स्वगत) नसत्या गोष्टींची लांबण लावीत बसली आहे. पण पत्राची गोष्ट जशी कांहीं तिच्या गांवचीच नाहीं. मलाच निलाजऱ्या सारखं ती, तिची हांजी हांजी करून तें विचारायला लावणार!

**नंदिनीः**—( स्वगत ) ही अजून कसं विचारीत नाहीं, पत्राचं काय झालं तें? मीं होऊन फटकळासारखी सांगूं तरी कसं हिला तें? माझं नाहीं बाई धारिष्ट होत! ( उघड ) अग मला तूं पत्राचा शोध घ्यायला धाडलं होतंस ना?

**सुशीलाः**—तें तुला आतांच आठवलं नाहीं? नंदिनी, माझ्या प्रियाच्या पत्रावरील नुसत्या पत्त्याचं अक्षर पहातांक्षणींच मी त्याचे पटापट शंभर मुके घेऊन मग फोडणार आहे हो तें पत्र! दे, दे तें! अग तूं अशी चूप कां? विरहीजनांच्या विव्हलतेचा उपहास करण्याची क्रूर करमणूक तुलाहि गोड वाटते, नाहीं? मग येतांच कां दिलं नाहींस तें पत्र? अशी ग काय भलतीच थट्टा.

**नंदिनीः**—अग अशी नसती थट्टा मीं कशी करीन बरं! सखे, खरंच पत्र आलंच नाहीं! हे बघ माझे हात. आहे का त्यांत?

**सुशीला**:—तुझ्या पोटकुळीं लपवीत असशील. ( चांचपून पहात ) तूं मागं अेकदां असंच फसवलंस !

**नंदिनी**:—अग, तेव्हा पत्र आलं होतं म्हणून क्षणभर आलं नाहीं म्हटलं. वाढलेल्या अुत्सुकतेनं किंवा पळभरच्या सहनीय निराशेनंहि प्रियवार्ता अधिकच प्रिय वाटते म्हणून कुशल दूति सखीना थोडं छळूनच प्रियवार्ता देतात. पण आज की नाही, तुझ्या गळ्याशपथ या टपालानं रावराजे यशवंतराव याचं पत्र आलं नाही !

**सुशिला**:—( फुलांची परडी फेंकून ) बोलं नकोस जा माझ्याशी ( मंचका-वर गालुशीआड तोंड झाकून पडते ) बोलं नकोस म्हटलं ना माझ्याशी !

**नंदिनी**:—पण माझ्यावर का रागावतेस बरं ! मी टपालवाली असत्यें तर सरदाराना स्वत: गाठून बळं बळं पत्र लिहवून आणलं असतं !

**सुशिला**:—चल ? इथल्या इथं तुला नीट चवकशी करण्याचा कंटाळा येतो नि म्हणे थंव नि त्यंव ! राजवाड्यात जाअून शोध करायलाहि काही हरकत होती वाटतं ! श्रीमंताकडे तरी सरकारी टपालातून सरदाराच्या काही उलाढाली नि पत्ते कळलेच्च असतील !

**नंदिनी**:—तिथं शनिवारवाड्यांत देखील जाऊन आलें, बरं ! म्हणूनच अुशीर लागला थोडासा. तिथं अितकंच कळलं की दिल्लीचं सरकारी टपाल जरी आलं आहे तरी अंतर्वेदीत शिरलेल्या मराठी सैन्यातील टपालाच्या पिशव्या आल्या नाहीत. अंतर्वेदीतील शत्रूंनी मराठी सैन्याची डाक मारण्याचा सपाटा चालविला आहे असं जो तो म्हणत होता.

**सुशिला**:—म्हणजे ? मराठी सैन्य अंतर्वेदीत शत्रूच्या पेचांत फसलं आहे कीं काय ?

**नंदिनी**:—हाये ! तो दुष्ट नजीबखान मराठ्यांस शरण आल्यावेळीं त्यास सैन्यांतच ठेवून मराठ्यांनीं त्याचा डाव त्याच्यावरच अुलटाविला. तो हातीं अलिप्त राहिल्यानें हूं का चूं न करितां त्याचं सैन्य स्तब्ध राहिलं नि अेक बारहि न काढावा लागतां दिल्ली मराठ्यांस मोकळी झाली ! येथपर्यंतची बातमी तुला माहीतच आहे. पण नजीब जरी स्वतः नांगी टाकून पडला तरी त्यानं

अंतर्वेदींतील पठाण रोहिल्यांकडून, परस्पर आंतून सूत बांधून, मराठ्यांस कोंडण्याचा कोणचासा मोठा घाट घातला. आणि त्या आणि पावसाळयाच्या पेंचात फसून दुआबमध्यें गंगा यमुनाच्या कात्रीत मराठी सेना सापडल्या. मागं दत्ताजी शिंद्यास अिथंच, असंच, ह्याच शत्रूंनीं कोंडलं होतं!

**सुशिला:**—अगबाअी! तर मग माझ्या प्रियकराचं पत्र या दोन महिन्यात न येण्याचं कारण हेंच. रावराजे यशवंतरावहि अंतर्वेदीतील मराठी सैन्यांत असून संकटात वेढले गेले असावे! माझ्या दयिताचा जीव कोणच्या तरी धोक्यात आहे! नंदिनी, मागं पानपती ते संकटात असतां समरांगणात ताअी त्याचेजवळ होती. मी ताअीची प्रतिनिधि असून इथं अशी माशा मारीत नि मुळमुळू रडत कशी पडूं! नंदिनी, मी माझ्या सख्याकडे जाणार! मी हिंदु वीरांगना—अंगना म्हणून सख्याचा विरह मला साहवत नाहीं. हिंदु म्हणून, हिंदु सैन्य अशा संकटीं वेढलं असता गाद्यागिरद्यावर लोळत मला राहवत नाहीं. माझ्या प्रेमाची नि माझ्या धर्माची, माझ्या सुखाची नि माझ्या कर्तव्याची, अशा दोन्ही वाटा आता या एकाच वाटेशी लागल्या. तीच आता माझी वाट!

**नांदिनी:**—पण वेडे, तूं अबला अेकटी जाऊन, अेक लाख वीरानी लढवल्या जाणाऱ्या हिंदूंच्या धर्मयुद्धात विशेष तें काय करूं शकणार!

**सुशीला:**—त्या सैन्याची संख्या अेक लाख आहे ती अेक लाख अेक तरी करीन ना? राम सेतु बांधून लंकेवर गेले तेव्हा अेक खार देखील वाळूंत अंग भरून, तें अंग समुद्रात झाडून, त्यात चार वाळूच्या कणाची का होअीना, पण भर घालीत होती म्हणतात? त्यानं समुद्र थोडेच भरले! पण त्यानं तिचं कर्तव्य सरलें!

**नंदिनी:**—पण या स्वारींत स्त्रियास मज्जाव आहे! तूं सैन्यात शिरणार कशी?

**सुशीला:**—स्त्रीस मज्जाव नाहीं! स्त्रीवेषास मज्जाव आहे. मी पुरुष वेष करून जाअीन. कसं शिरायचं तें तिथं गेल्यावर सुचेल तसं करीन. हें बघ अियून अेखादा हिमालयीन ऋषि कुमाराचं सोंग घेअून दिल्लीस छावणींत तर जाता येअील ना? मी तसंच करणार.

**नंदिनी:**—अशा सत्साहसापासून मीं तरी तुला निवृत्त कशी करूं! सखे तूं देशील ती आज्ञा मी पाळीन.

सुशीलाः—चल तर, मला अेक ऋषिकुमार बनीव चल. अहाहा, माझी सारी हुरहुर नाहींशी झाली. जसं कोण्या लग्न समारंभास जायला निघावं तसं माझं मन कसं अुल्हासलं आहे. चल चल !

॥ पद ९ वें ॥

अस्नीहि बाला । अबला । चालल्यें रणाला ॥
त्यजुनि कात विरही ग्लानी । नागिणची चवताळोनी ॥
ही, मी, दिले जिस पाणी ॥ असिलता कराला ॥ अबला० ॥१॥

---

## प्रवेश ६ वा.

[ अलाहाबादला बादशहा शहाअलम आणि अिंग्रज वकील बसले आहेत. ]

अिं. वकीलः—( अिंग्रजी अुच्चारांत ) Mighty Emperor! बादशहा शहाअलम अंग्रेज बहाडूरके टरफसे हम आपको अर्ज करटे है कि अिन मरेठोंका विश्वास नही रखना. आज त्याचा वकील टुह्मांस घेअून जाण्यास आला आहे. टुह्मीं त्याचे बरोबर डिल्लीस जाल टर टे टुह्मांला पकडून कैड कर-करतील कैड ! मरठ्ठे बिलकूल Cunning people है, बडे लुचे लोक !

शहाअलमः—वकील, तुम अंग्रेज बहादर हमारे अिमानदार सेवक है. अिसलिये तो हमने कुंपनीसरकारको बंगालबहारके बादशाही दिवाण, नबाब बनाया. भाअूसाहेब आणि अबदाली हे दोघेहि माझ्या बादशाहीचे दुष्मन्. ते दिल्लीभोंवतीं लढूं लागले तेव्हा जीव घेअून आह्मीं तक्त सोडून पळालों ते आज दहा वर्षे दारोदार भिकाऱ्यासारखे फिरत सध्यां या अलाहाबादेस सुजा-अुदौल्यांच्या आश्रयास आहोंत. पण आह्मांस दिल्लीस नेअून तक्तावर बस-विण्याचें साहस कुणीहि करीना. तेव्हां आह्मीं पुण्यास पेशवे सरकाराशीं आह्मांस दिल्लीस न्यावें ह्मणून बोलणें केलें. आतां नाहीं ह्मणूं तर साफ बुडूं. नाअिलाज है ! कमनसीबी है ! लेकिन् क्या करें ! आमचे स्वतःचे मोठेमोठे पिढीजात मुसलमान सरदार—रोहिले पठाण, पण पानपतनंतर आह्मांस दिल्लीस न नेतां तेच बादशाही खाऊन टाकीत आले ! मराठे अेक काफर तर मुसलमान सात काफर ! अब हम किसके बलसे मराठोंको नाराज कर सके !

अं० वकीलः—हमारे ! अंग्रेज बहादूरके बलसे अभीभी मुसलीम सल-तनट ये काफर मराठोंके हातसे बच सकटी है। Just see ! पठाण रोहिले मुस्लीम, पण टुमचे दुष्मनः मरेठा हिंडू टो टुमचा दुष्मनंचः पण आह्मी अंग्रेज न हिंडू न मुस्लीम ! ह्मणूनच टुमचे खरे डोस्त !

चोपदारः—( प्रवेशून ) जहांपन्हाह ! मरहट्टेके वकील–अे–मुतालिक राव-राजे यशवंतराव आते है.

बादशाहः—आना देव अुनको. अंग्रेज बहादुरके वकील भी अिधरही ठैरेंगे. ( यशवंतराव येताच ) आअिये वकील साब ! फर्माव क्या अरज है ?

यशवंतरावः—दुसरा अर्ज काय असणार ! बादशाह, नजीबखान तुमचा सगळा आधार; स्वभावें केवळ सर्प पण मराठ्याच्या पोलादी टांचेखालीं पुरता ठेंचला जाअून शेवटी मरणीं मेला असतांही आतां कोणाचे बळावर बादशाह मराठ्यांस मिळून दिल्लीस येण्यास विलंब लावतात तें स्पष्ट सांगावें, नाहींतर आजचे आज बादशहानी आमचेबरोबर निघावें. बस्स तिसरी गोष्ट नाही !

अं० वकीलः—हां हा ! यशवंटराव ! टूमी कोनाशी बोलटां आहां ! प्रत्यक्ष टूमच्या बादशहांशी असलें बंडखोर वर्टन ! Shame ! Shame !

यशवंतरावः—मोंगल बादशहांशीं किती मर्यादेनें वागावें हें मराठ्यांस, स्वतःच्या अिंग्रजी जान बादशहांस भाल्यांच्या कैचींत पकडणाऱ्या आणि चार्ल्स बादशहास फांसावर लटकवणाऱ्या तुह्मीं अिंग्रजांनीं शिकवूं नये तर कोणी शिक-वावें ! साहेब, बादशहा नि आह्मीं अेकमेकांशीं वाटेल तसे वागूं. तो तुमचा प्रश्न नाही.

अं० वकीलः—क्यौं नही ? आह्मीं मराठ्यांचे डोस्त, बाडशहांचे पण डोस्त. डोस्तीच्या नात्यानें आह्मी टूह्मांस चांगलें टेंच सांगतों. हें पहा, यशवंटराव, नजीबखान मेले टरी बंगषखान और हाफीजखान जिवंट आहेत. त्यांच्या फौजांनीं टुह्मांस मागें पानपटला झोडपलें, टसेंच आज दोआबमध्यें गांठून टुह्मांस कोंडून झोडपीत आहेत हें खरें कीं नाहीं ? टेव्हां डिल्लीस बाडशहांस नेअून बसवण्याचें बळ टुमच्यांत आहे असें बाडशहांस कसें वाटावें ? जो फट्टे होअील त्येच्या बळावर पुढें जावें, टोंवर अिठेंच रहावें असें त्यांचें मट आहे. मराठ्यांनीं आजच बाडशहांस नेण्याची जबरडस्ती केल्यास कुंपणी सरकारचीही मराठ्यांवर अिटराजी होईल अशी मला भीटि वाटते !

**यशवंतराव:**—मराठ्यांस पावसाळयाच्या पेंचांत गंगायमुनांमध्यें बंगष कोंडून पहात आहे हें खरें. पण ते कांहीं असले तरी बादशहाशीं चाललेल्या मराठ्यांच्या राजकारणांत अिंग्रज कोणतीहि नसती ढवळाढवळ करतील तर आजच्या अिंग्रजांशीं असलेल्या मराठ्यांच्या मैत्रीच्या हातात वैराची तलवार दिसूं लागेल अशी मलाहि भीति वाटते!

**अिं० वकील:**—हाः हाः हाः! यशवंटराव, टी मराठयांची टलवार मुसलमानास डाखवाः टिला टे भिटील. पण आह्मी ब्रिटिश—आह्मीं टिला भीट नसटो. टूमी हिंदु—टूमीं फाटाफूट झालेलेः टुमी सगळयाचे गुलाम—मुसलमानाचे देखील Slaves पण ब्रिटन कोणाचेहि Slave पूर्वी झालें नाहीं—आज झालेलें नाही!

**यशवंतराव:**—ब्रिटन आज कोणाचें गुलाम झालेलें नाहीं, तर महाराष्ट्रहि आज तरी कोणाचें गुलाम नाही. पण ब्रिटन पूर्वी कधीच कुणाचे Slave झाले नाही ही तुमची घमेंड निदान मला तरी सांगूं नका. रोमन लोकानी ब्रिटनला आपलें गुलाम केलें होतें कि नाहीं! तें रोमन सैन्य ब्रिटनला सोडून चाललें तेव्हां "जाअूं नका! आह्मास सोडून जाअूं नका नाहीतर We shall find ourselves between the devil and the deep sea!" ह्मणून स्कॉच लोकाच्या भयानें रोमन लोकाचे पाय कोणाच्या भ्याड गुलामानें धरले? ब्रिटननेंच ना? सॅक्सन्सनी कोणाला जिंकलें? ब्रिटनला! डचानी कोणाला गुलाम केलें? ब्रिटनला! नॉर्मनानी कोणावर स्वारी भरली? ब्रिटनवर! नॉर्मन लोक ज्याला वाइटांतील वाईट शिवी द्यावयाची त्याला "अिंग्लिश मन" ह्मणजे गुलाम ह्मणून ह्मणत—ते दिवस अिंग्रज लोकानींहि विसरूं नयेत! साहेब, मीं तुमचा देश पाहून आलेला आहें. तुमच्या घराचे किती वासे पोकळ नि किती भक्कम, ते मोजून आलों आहें! आज या अवाढव्य हिंदुस्थानातील हिंदुलोक जातपात प्रांतभेदानें फाटाफूट झालेले आहेत, पण त्या तुमच्या टीचभर अिंग्लंडचे देखील ज्या सात राज्यात सात तुकडे अुडालेले होते त्या Heptarchy स आठवा! आणि हेंहि ध्यानांत ठेवा, अशी फाटाफूट झालेली हिंदुस्थानची ही दुर्बलता देखील निदान आज तरी राज्यशक्तींत तुमच्याहून सबळ आहे! ज्याला खुमखुम असेल त्यानें हिंदुपति मराठयांस आडवें येअून पहावें!

अिं० वकिलः—Well यशवंतराव, मराठ्याचा बाहु हिंदुस्थानांट जरी आज अिंग्रजांहून समर्थ असला टरी टो अुद्याहि टसाच राहील काय ?

यशवंतरावः—राहीलही !–आणि नाहीहि राहणार ! प्रत्येक अुदयाचा अंत अस्तांत होतो, प्रत्येक अस्ताचा अंत अुदयात होतो ! Heptarchy चें ईंग्लंड जसें अेक राष्ट्र झालें, तसें आजच्या रोटीबंदीनें, समुद्रबंदीनें, जातीबंदीनें जखडलेलें हें हिंदुराष्ट्र त्या बेड्या तोडून अुद्या अेक अत्यंत प्रबल असें अेक-राष्ट्र होअीलहि ! आज अटकेपर्यंत चढून जाअून त्यांनीं जसें मुसलमानाच्या आक्रमणापासून महाराष्ट्र बचावलें तसें समुद्रबंदीची, रोटीबंदीची, बेडी तोडून लंडनला जाअून अुद्या ते हिंदुस्थानाहि बचावूं शकतील ! साहेब, अिंग्लंडहून तुह्मी हिंदुस्थानात येता हें जर संभवनीय आहे तर मुंबअीहून आह्मी अिंग्लंडला जाणें असंभाव्य का असावें ?

अिं० वकीलः—(But the moment a Hindu crosses the sea he ceases to be a Hindu)

यशवंतरावः—पण मी सातहि समुद्रावर जाअून आलों तरी हिंदूच राहिलों कीं नाही: अुद्या अनेक हिंदु माझ्याच मताचे होणार नाहीत ह्मणून कशावरून ?

अिं. वकीलः—( स्वगत ) God forbid ! How I bless this curse that lays these stupid Hindus under a religious injunction which forbids them to cross the seas over to our lands but allows us to cross them over to their lands ! (अुघड) Well, Well, Yeshwantrao we have met here neither as historians nor prophets but as practical men to deal with practical politics of to-day ! बरें, यशवंटराव जर मराठे स्वतःस अेवढे सबळ समजटाट टर टे या मुसलमीन बादशाहासच दिल्लीस कां नेटाट ! हिंदूंच्या साटारच्या छट्रपटीसच आजच्या आजच त्या बादशाही टक्टावर कां बसवीट नाहींट ?

यशवंतरावः—ज्या कारणांसाठीं तुह्मी अिंग्रज स्वतःस अितके सबळ समजत असतांही आजच्याआजच बंगालचे स्वतंत्र राजे न होतां याच मुसलमीन

बादशाहीचे नुसते दिवाण असल्याचा बहाणा करीत आहां त्याच कारणासाठी ! पटली खूण ? आणि ह्मणूनच अुग्रांचा प्रश्न अुग्रांवर सोडून हे शाहाअलम बादशाह ! आज तरी अुभ्या हिंदुस्थानांत सबळतम असलेल्या या मराठ्यांच्या बाहूचा आधार घेअून अुठ', दिल्लीस चला आणि बाबरच्या तक्तावर नुसते बसण्याचा तरी जो मान अजून तुह्मांस अुरला आहे तो अुपभोगा ! मराठ्याच्या याच हातानें दक्षिणच्या मुसलमानी पांच बादशाहींस धुळीस मिळविलें; पुर्तुगीजांची रग जिरवून ठाणें, वसई घेतली; शिद्याचे शीर छाटून कोंकण स्वतंत्र केलें; अिंग्रजांस कलकत्त्याच्या " मराठा डिच " चे आतच डाबून ठेविलें; औरंगजेब, नादिरशाह, अबदाली सारख्यांचा दम अुखडून टाकला; कटक घेतली; अटक घेतली

॥ पद १० वें ॥

जितशतरण असि हा । छत्रपति हिंदुपत पातशहांचा त्या ।
म्लेच्छ निवह हंत्या । मानधन । सुजनांचा शरण ।
खलगर्व हरण । अहा ॥
पाच पादशाही ही । दख्खनच्या त्या पाही । तुडवित ह्मणि ।
विंध्याचल अुल्लंघुनि तुंबळ । जिंकीत चंबळ गंगा काठ । घालीत थेट सिंधुसी गांठ । पूर्तुगिजांग्ल फिरंग । तुर्कमदध्वजभंग ।
मुक्त हिंदु जगताला करि पहा । जितशतरण असि हा ॥ १ ॥

तो हा मराठयांचा प्रबळ बाहु, हे बादशहा शाहाअलम, मैत्रीसाठीं मीं पुढें करीत आहे. बोला, तो मित्राचा ह्मणून धरता कीं वैऱ्याचा ह्मणून ! आता अेका शब्दांत अुत्तर द्यावें !

**बादशहा:—**मित्राचा ह्मणून ! मराठे बेशक बहादूर है ! रखेंगेतो मेरी बादशाही बेही जीती रख सकते है ! ( अुठून यशवंतरावांचा हात धरावयास अुजवा हात पसरून हळूहळू जातो. )

**अिं० वकील:—**( स्वगत ) By God, now I must strike boldly ! Now or never ! ( अुघड ) हां हां ! बाडशाह ! बाडशाह ! वह मरहट्टोंका हात है ! अिंग्रेज बहाडूरका हाट अिढर है बंगष हाफिजांच्या वेढयांत मरहट्टे डुळीस मिळणार हें नक्की ! मग फशाल ! आह्मीं अिंग्रेज तुह्मांस

स्वटः डिल्लीस नेतों ! अिकडे या ! मराठे हिंदुपद पादशाही करना मंगटे है-- हम अिंग्रेज कुछ नही मंगटे ! ( बादशाहाचा डावा हात धरतो. बादशाह गोंधळून ताटकळत भुभा राहतो. )

**बादशाहः**—या खुदा ! अकबर औरंगजेबके तक्त का मै मालिक–मेरी यह क्या दुर्दशा हो रही है ! अब क्या करूं ! ( थोडे थाबून ) यशवंतराव, रोहिले हमारे मुस्लिम; अुनको हम नही छोड सकते ! त्याचा मराठे पराभव करीतों तरी आह्मी तुमच्या बरोबर येअूं नये हेंच ठीक ! ( अिंग्रजाकडे झुकतो. ).

**यशवंतराव**:—ठीक तर, ठीक ! बस ! शाहाअलमाला बादशाह ह्मणून हा शेवटचा मुजरा ! करार तुह्मी मोडिलात ! आता दिल्लीच्ये तक्त्यावर मराठे वाटेल त्यास बसवितील, वा कोणासच बसवणार नाहीत, वा स्वतःच बसतील ! चाललों आह्मी !

**बादशाहः**—सबूर ! सबूर ! यशवंतराव अैकून तर घ्या !

**अिं० वकीलः**—( हळूच ) जाना डेव जी !

**चोपदारः**—( प्रवेशून ) जहांपन्हाह, गुन्हा माफ ! आधी खबर पहुचाना हमारा फरजही है ! क्या कहूं ! आफत् ! आफत् ! मराठोंकी और बंगष हाफिजोंकी बडी करार लढाअी हुअी ! दो बाजूकी दीड लाख फौज लढी ! लेकिन, मराठ्यानी पठाण रोहिल्यांस साफ बुडवले ! बंगष हाफिज अुधळून गेले ! फौजेंतील सारा पठाण मराठयांनीं कापून काढला ! दुआबभर अवांतर पठाण रोहिला पळत आहे आणि पानपतचा सूड ह्मणून गर्जत मराठी सेना नि स्वार त्यांस पाठलागीत आहे ! !

**यशवंतरावः**--हरहर महादेव ! हरहर महादेव !

**बादशाहः**—अफसोस ! अफसोस ! अखेरमे असली पानपत तो काफरोंने ही जिता ! यां खुदा !

**दुष्मनने वैर चुकाया तकदीर फूट गयी ॥**
**अब क्या लडे जो हातकी तलवार टूट गयी ॥**

**अिं० वकील**—( स्वगत ) My God ! Events have taken a diffierent turn ! We English are not yet prepared to face the Marathas single handed. I must

**leave this fellow to his fate and beat a clever retreat !** ( बादशहाच्या हातांतून आपला हात बळेंबळें सोडवून अर्धी पाठ फिरवून अुभा राहतो. मधून चोरट्या दृष्टीनें त्यांच्याकडे काय होतें तें पहातो )

**बादशाहः**—हा पहा आम्हीं मराठ्यांच्या मैत्रीचा हात घट्ट धरला. यशवंतराव, औरंगजेबाच्या वंशजानें ही आपली मान मराठ्यांच्या हातांत दिली. आतां ती छाटून टाकलीत तरी तुह्मांस कोणी विचारणारा नाहीं !

**यशवंतरावः**—तरीदेखील आपण जर अजूनही मराठ्यांशीं प्रामाणिकपणें विश्वासून वागाल तर मराठे तुमच्या केंसासहि धक्का लावणारे नाहींत ! चलावें आपण ! ( बादशाह यशवंतरावाचा हात धरून जातात. अिंग्रज वकील तिकडे तिरकस पहात शीळ घालीत अुभा राहतो. ) ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

[ फत्तरगडात रोहिल्यांचे हातीं पडलेली सुनीति. ]

**सुनीतिः**—( अिकडे तिकडे विचकत पहात येते ) या महालात आतां मी अगदीं अेकटी आहें. त्या मेल्या सादुल्ल्याच्या मुसलमानी पहारेकरणींची दृष्टि चुकवून आज कितीतरी दिवसांनीं मी ही माझी मराठी पैठणी मराठी अैटीनें नेसल्यें आहें ! पानपतीं मराठी स्त्रियांवर हल्ला करून रोहिले राक्षस आले त्या झटापटींत मीं नि माझी आअी झुंजून घायाळ होअून पडलों. तिकडे माझा कांत शिलेदार यशवंत रणांत आधींच पडला होता. मला तशीच घायाळ असतां या सादुल्लाखानानं पळवून अिथं आणिली—माझ्या दयिताची नि माझ्या आअीची काय अवस्था झाली असेल ती देवाला ठाअूक ! या सादुल्ल्यानं मला मेलेपणीं जिवंत केलं आणि मला बळानं मुसलमान करून माझ्याशीं निक्का लावून मला जिवंतपणीं मेल्यासारखं केलं ! तेव्हापासून मींही अशी मेलेलीच जगतें आहें ! मला मुसलमानी पेहेरावच घातला पाहिजे ही त्याची सक्तीची आज्ञा. त्या पेहेरावांत, कफनात प्रेत शोभावं, तशी मी त्याला शोभिवंत दिसतें ह्मणे ! पण सादुल्लाखानाच्या हातांत गवसलेल्या या माझ्या कुडीच्या प्रेतांतून निघून गेलेला माझा जीव, माझं मीपण, अेखाद्या जिवाशीं बाळगून ठेवलेल्या गुप्त रत्नासारखं मीं जर अिथं कुठं अजून जतनवून ठेअू शकलें असेन

तर तें या माझ्या प्याऱ्या पैठणीच्या घडींतच होय! माझी मराठी पैठणी ती! किती गोड; अशी लगटून मिठी मारावीशीं वाटते! खरंच सखे, आओीचे किती लाड, बहिणीची—माझ्या सुशीलेचीं किती कौतुकं किती असूं किती हंसूं प्रेमल हेंदु पैठणी, तुझी घडी अुकलताच या तुझ्या आकाशी आकाशांत चांदण्यासारखी चमकून अुठतात, या माझ्या दुर्दैवाच्या काळ्याकुट्ट रात्रीत जीवनाच्या चमका चमकवितात! आणखी कसली ही गोड आठवण तूं माझ्या कानात कुजबुजलीस? खरंच, सखे, माझ्या दयितानं, माझ्या यशवंतानं, माझ्या अुसळत्या यौवनाचा हात जेव्हा प्रथम धरला तेव्हा प्रीतीच्या अुसळीसरशी भरून आलेली माझी छाति मी लाजऱ्या लोलुपतेच्या या पदरानंच अशी झांकली, नाही का ग?

॥ पद ११ वें ॥

प्रिय। सहसाचीं संग लुब्ध हात धरी गे,
जधिं। मजवरि पहिलीच मदन मात करी गे॥
कामावेशें, थरथरवीती,
कुणि नव वीज करी कंपित तनु आंत वरी गे॥ १॥

अग बाओी, ही माझी अम्मा अशी अुतेजित झाल्यासारखी लगबगीनं माझ्याकडेच का बरं येत आहे? बापडी बिचारी म्हातारी! तिच्या भरल्या हिंदु माहेरा सासऱ्यांहून ओका रोहिल्या शिपायानं पकडून पळविली, बाटवून मुसलमानली नि या सादुल्लाखानाच्या घरच्या दासीपणात जन्मभर राबविली. अम्मा, ये, आत ये!

**अम्मा**:—सुनीते! अग अैकलंस का तूं? अग पण हें काय? यंव! किती दिवसानी तरी आज ही मराठी पैठणी नेसलीस! खरंच, सुनीते, त्या बाटग्या मुसलमानी पेहरावातून निघून तूं या आपल्या हिंदु वेषांत दिसलीस ना कीं तुझी कायापालट ग्रहणांतून सुटलेल्या चंद्रकोरीसारखी मनोहर दिसूं लागते! पण मीं जें आता सागायला आलें आहें तें अैकतांच, सुनीते, तुझ्या कायेचंच नव्हे, तर जीवाचंहि ग्रहण सुटल्याचा तुला आनंद होओील. अग, अैकलंस का, जो दिवस डोळ्यानीं पहावा म्हणून आपण आत्महत्त्येनं आजवर डोळे मिटले नाहीत तो दिवस अुजाडला! "पानपतचा सूड" म्हणून गर्जत मराठी

सैन्यें झंजावातासारखीं दाही दिशा धुंदवीत दिल्लींत–दुआबांत घुसलीं. आजवर या फत्तरगडांत या किल्लेदार सादुल्लाखानानं ही बातमी गुप्त ठेविली होती, पण मराठ्यांचा मार खाऊन पळालेल्या रोहिल्यांच्या झुंडीच्या झुंडी गंगा-मापारी अुतरून गांवोगाव पोंचल्यानं आज बाजारांत जिकडेतिकडे ही बातमी अेकदम फुटली आहे!

**सुनीतिः**—अम्मा, पण अितकी चांगली बातमी सहसा खरी नसते. बाजार-गप्पेहून दुसरा कांहीं नक्की पुरावा नाही का?

**अम्माः**—अग पण खरंच! विसरतच होतें मी! जी खरी आनंदाची बातमी ती तशीच राहिली! सुनीते, खोटं म्हणून माझा हिरमोड करूं नकोस अं!–तुला गळ्याची शपथ आहे. अग या मराठी सैन्यांत रावराजे यशवंतराव म्हणून कोणी मोठे पराक्रमी नवे सरदार आहेत म्हणे! अग, तुझा तो प्रियकर यशवंत तो हाच तर नसेल ना?

**सुनीतिः**—अम्मा, किती भोळी आहेस तूं! अग, पानपतीं झुंजून पडताना मी समक्ष माझ्या प्रियकराला पाहिलं! अग अेवढी भाग्याची मीं असत्यें तर—

**अम्माः**—अग खरंच! सांगायचं तें राहून गेलं. हे रावराजे यशवंतरावहि पानपतीं पडले–पण कोण्या बैराग्यानं म्हणे संजीवनीमंत्राचं पाणी शिंपडून त्यांस पुनः अुठवलं, अितकंच नव्हे, तर त्यांची पहिली पत्नीहि म्हणे अशीच पानपतीं पडली होती. ते अजून तिची छबी हृदयाशी ठेवतात नि अेकांतीं तिच्याकडे पहात अश्रू गाळतात!

**सुनीतिः**—आणि त्या सरदारास अेकांतांत तसे प्रेमाश्रु गाळीत असतां या फत्तरगडच्या बाजारी लोकांनीं पाहिलं नि ती वित्तबातमी तुला दिली, नाहीं? भोळी ग भोळी!

**अम्माः**—अग त्यांत काय अवघड आहे? कोणसं म्हणत नव्हतं कांकीं बायाबापड्यांची बाजारच्या चौकावर चाललेली रडारड आजूबाजूसदेखील ऐकूं जात नाहीं. पण अशा थोरामोठ्यांचा अेकांतांतील लहानसा सुस्कारासुद्धा पिढ्यापिढ्यास सारखा अैकूं येत राहतो. थोरांच्या अेकांतांत भिंती अैकतात, वाऱ्यांना वाचा फुटते, अंधेरच पाहतो.

**सुनीतिः**—अम्मा, अम्मा, तूं अद्भुत आशेच्या सोनेरी खंजिरानं हें माझं हृदय असं कशाला भोसकतेस बरं? अम्मा, तुझ्या भोळेपणाच्या साथीनं माझंहि मन पछाडलं कीं काय? माझं अूर धडधडतं आहे. अहाहा, देवाच्या चरित्रातील अद्भुताचे रंगांत मनुष्यांची चरित्रेंहि विधि रंगवूं लागला की काय! पण—पण—हे यशवंत ते यशवंतच कशावरून? माझ्या दयिताला रणीं पडलेलं मीं प्रत्यक्ष पाहिलं, ते स्वर्गींच गेले! आता स्वर्गांचीच दारं देवानं सताड अुघडलीं असलीं तर गोष्ट निराळी! पण तो माझा घरगुती प्रश्न जरी सोडला तरी मराठ्यांनी पानपच्या सूडासाठीं कांहींतरी मोठा प्रळय मांडला आहे अितकं मात्र या बातम्यावरून खरं दिसतं! आणि तेवढं जरी खरं असलं तरी आपण आत्महत्त्येच्या पालापाचोळ्याच्या चितेवर जळून न जातां या रोहिल्यांनी भ्रष्टविलेल्या देहास त्याच राक्षसाचा बळी घेणाऱ्या रणकुंडातील यज्ञाग्नीच्या ज्वाळा होण्यासाठीं राखून ठेवलं हें योग्यच ठरेल!—( थोडा विचार करून ) अम्मा, आतां आपल्याला आपला फार दिवसांचा डाव जर साधायचा तर मोठाच व्यूह रचला पाहिजे. आतां प्रथम या सादुल्ल्याला थोडा लाडात आणवणं भाग आहे. पाघळला की बेछूट पाघळतो. कांहीं नक्की बातमीहि तशी बोलून जाअील. त्याचा मजवर विश्वास जसजसा बसेल तसतसा आता पुढचा बेत.

**अम्माः**—पण तुला त्याच्याशीं सारखी हिडीसफिडीस करायची खोड आहेना! ती कशी सोडशील तें पहा! अग हा तो आलाच अिकडे! जा, जा, तो मराठी साज झटकन पालटून ये कशी! चल आत, आलाच तो! ( जातात )

**सादुल्लाः**—( प्रवेशून ) सोनपती! अै मेरे प्यारी सोनपती! आं, आज महेलमें आनेको देर क्यौं किया है मेरे प्यारीनें? मगरूर मरेठोंनें दिल्ली दुआबमें जो गहजब करके हमारे मुसलमानोको उखेड दीया है असकी कुछ बात तो अिसने नही सुनी? असको सुनेतो यह मरेठोकी बची और भी मगरूर बन जायेगी! देखो क्या अजब बात है! आज दहा वर्षें मीं हिला मुसलमान केल्याला झालीं, हिला मूळचा विसर पडावा म्हणून हिचें मूळचें हिंदु नांव सुनीति हे देखील न अुच्चारता हिला माझ्या सोनेपत पानपतच्या बहादुरींचें यादगार असें "अै सोनपती" "अै पानपती" हें नाव ठेवलें, हिच्याशी

निक्का लावून हिला माझ्या जनान्याची राणी करून ठेविली, पण अजून तिच्या मनांतील मराठी बाणा, दुष्मनीची अढी कांहीं सुटत नाहीं ! जाव ! ती अढी धारे नाहींतर गोडी धरो ! श्री आणि स्त्री, दौलत और औरत, यांच्या आवडी-नावडीस भ्याडानीं भ्यावं ! स्त्री और श्री या दोन्ही नुसत्या वस्तु असतात, व्यक्ति नव्हेत. त्यांना स्वतंत्र मनच नसतं ! तरुणी हें पुरुषांच्या अिष्काचं तक्त आहे. तक्ताला जसं मन नाहीं तसंच तरुणीलाहि नाहीं. जो जिंकील, ज्यांचं मन त्यांवर बसेल त्यांना त्यानीं त्यांच्यावर बसूं दिलंच पाहिजे. न करीना ती प्रेम ! प्रेम करून तरी ती असे अधिक काय देणार कीं जें मी पराक्रमानें तिच्यापासून आधींच छिनूं शकत नाहीं ! वाह् ! आयी, मेरी प्यारी आयी ! ( सुनीति मुसलमानी वेशात येते ) अै प्यारी सेनपती, आव ! आव ! तू नही आती तो मै बलसे तेरेको अैसी पकडके लाता ! आ, ये क्या अजब बात हुअी ? मी तुझा हात धरला असताही नेहमीप्रमाणें तूं तो झिडकारलास कसा नाहीस ? त्यामुळें माझा हात कसा ढिला पडत आहे. तुझी आजची भेट अळणी लागत आहे. देख, कामशांतीके आनंदके समान क्रोधशातीका आनंदभी बडा मीठा रहता है. भ्याड बकरीला खाताना सिंह नुसती अेक अळणी आळशी ढेकर देतो ती कोणीकडे, आणि अुलटून आगावर आलेल्या मत्त हत्तीच्या गंडस्थलावर झेप घालून तें रक्त जेव्हा तो पितो तेव्हा त्या क्रोध-शातीच्या अुन्मत्त आनंदाच्या त्याच्या डुरकाण्या कोणीकडे ! तूं अेखाद्या स्वयं-वरात मला होअून माळ घातलीस ना तर मला कामशातीचाच आनंद तेवढा लाभता. पण तूं काफरोकी लडकी, पानपतीं खंजीर अुपसून अंगावर आलीस, तेव्हा तुला पिरगाळून पकडून पळवून तूं धडपड करताना जेव्हा अशी छातीशी मी चेपून धरलीना तेव्हा कामशातीच्या अळणी आनंदात क्रोधशातीच्या मादक मसालेदार आनंदाची भर पडून जी लज्जत आली ती औरच ! क्यों प्यारी सेनापती, तूं सगळे अैकत आहेस ना ?

**सुनीतिः**—जी हां. सीताजी रावणाची वाह्यात् बडबड ज्या धिक्कारानें अैकत होती त्याच धिक्कारानें मी आपल्याही वल्गना अैकत आहे !

**सादुल्ला:**—रावणका धिक्कार सीताजीने ठीकही किया, कारण तो खुळचट तिला बळानें पकडण्याचें सोडून बुळगेपणीं प्रार्थीत होता. लेकिन मै तो जबर-दस्तीबिगर बातभी नही करता ! बोल मै अिसलिये रावणसे भी बडा हूं या नहीं ?

**सुनीतिः**—जी हां! आप रावणसेभी बडे अत्याचारी हो! छोटे अत्याचारके वास्तेही रावण राक्षसके दसभी सिर काटे गये—आपल्यासारख्या महाराक्षसांचे या बड्या अत्याचारासाठीं—

**सादुल्ला:**—हे अेक शिरपण छाटलें गेलें नाहीं!

**सुनीतिः**—जी हां! सैतानाची केवढी ही कृपा!

**सादुल्ला:**—कां? सैतानाची का? देवाची कृपा ह्मण!

**सुनीतिः**—राक्षसाच्या देवालाच मराठे सैतान ह्मणतात!

**सादुल्ला:**—मरेठे? अब किधर है तेरे मरेठे?

**सुनीतिः**—तें मला या बंदीवासांत काय कळणार! पण मी स्वप्नात भलतेंचे सलतेच पाहिलें. काय सागू! तुमच्या शिरासारखे अेक शिर भाल्यावर टोचून ह्या फत्तरगडात महादजी शिंदे मिरवीत आहेत आणि तुमचे तें शिर ह्या तुमच्या थबकट मानेवर दिसतें त्यापेक्षां त्या भाल्याच्या अुठावदार पात्यावर कितीतरी छान दिसत आहे—असें मी स्वप्नात पाहिलें!

**सादुल्ला:**—( चमकून ) अबे सैतानकी बची! तूं जर पुन्हां असें वाह्यात बकलीस तर तुझ्या कंठाच्या ह्या सुंदर देठावरून हें तुझें शिर मात्र मुरगाळून फुलासारखे अलगत तोडीन; याद राख!

**सुनीतिः**—का बरं, आता असं चिडता कां? मी मघा तुमचा हात झिडकारला नाहीं, तर ह्मणालात कीं माझ्यावर प्रेम करूं नको, भाड! आणि आतां भाडल्यें तर असे भिता! काळेठिक्कर पडतां? मग आता पुन्हां प्रेमानें बोलू का? अैकातर! खानजी, आता मराठे माझे कोण! मी बाटलेली! त्याच्याकडे गेल्यें तरी मला ते हिंदु लोक मुसलमानच मानणार! धुडकावून देणार! आता माझे कोणी असाल तर तुह्मीच आहा! ह्मणूनच तुह्माला आज चिंताक्रांत पाहून माझे मनांतील प्रेम मी अुघड केलें? बोला, आज मघापासून असे दचकता कां? चमकता का? काळेठिक्कर कां पडतां?

**सादुल्ला:**—अहाहा! मै क्या सुनता हूं! अै प्यारी सोनपती, तेरा मुह मै रोज देखता लेकीन दस बरसमे आज पहिलेही मैने तेरा दिल देखा! बेशक तेरा दिल तेरे मूंहसेभी निहायत सुंदर है! मी आज चिंतेनें व्याकूळ झालों आहे हें जें तूं बरोबर ताडलेंस तें तूं अशी दिलदार होतीस ह्मणूनच! अबे सोनपती,

क्या कहूं ! मरेठ्ठे दिल्ली लेके रोहिलखंडपर चले आते है ! मेरी जान धोकामे है ! फेरभी–जानादे, प्यारी, मै अिन्ही बातोंमे रंजिश होके कुछ आराम पानेको तेरे महेलमे आया ! फेर सब कुछ बतला दूंगा, फेर सब कुछ देखा जायेगा ! अब पाहिले अिन तमाम बेचैनीको तेरे अिष्कके प्यालेमे डुबा देंगे चल !

मरना तो है सभीको शिकंदर भी मरा है !
पीडाल झटसे यार जो अिष्कका प्याला भरा है !

सुनीतिः—बिलकुल ठीक : खरोखरच प्याला काठोकांठ भरला आहे !

॥ पद १२ ॥

रुचतसे जो जयाला । तयाला पिअूं याचि प्याला ॥
झिंगुनिया रंगलेला । जिवाला कधी कोण भ्याला ॥
पिअुनि विषहि ते शंभु अमर ठेला ॥
अमृत पाजुनि राहूसि छाटियेला ॥
सुरा भासत तुज, पीच तूं तयाला ॥
हलाहलमय हा मीहि पिअिन प्याला ॥ —
वैराने झिंगलेला, जगाला, दंगवावयाला ॥

(जातात.)

अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.

—०००—

## प्रवेश १ ला.

( हाफीज रहमत आणि सादुल्लाखान तोफांच्या बातेऱ्या लावून सैन्यासह उभे आहेत. )

**सादुल्लाखानः**—( दुर्बीण लावून ) नामर्द! नामर्द! ये मरहट्टे कितने नामर्द है! देखिये जनाब हाफीज रहमतखानसाहेबजी, हमारे रोहिलोंके तोफखानेके गोलाबाजीसे फेर पीछे हट गये. देखिये! आमच्या रोहिलखंडावर दात ओठ खाऊन हा अेक लाख मराठा स्वारी करून आला खरा पण गंगा अुतरता अुतरता पहिल्या सलामीसच आह्मां रोहिल्यांनी बांधलेल्या ह्या अजस्त्र मोर्चापुढे आणि चालविलेल्या ह्या तोफांच्या भयंकर भडिमारामुळे तो दुष्मन कच खाऊन पुन्हा पाण्यातून परतला पहा! सरदारजी मुस्लीमोंके दुष्मनोंको तबाह करनेके लिये खुदाताला खुद अपने फेरिस्तोंको मैदानमे भेजता हे अैसा हमारे पाक तवारीखोंमे बारबार लिखा है! बस अुसी तरहसे अब भी फेरिस्तोंकी—देवदूतोंकी फोज अस्मानसे मैदानमे अुतर कर हमारी मददगार क्यों नही होगी? बुदपरस्तोंको अल्ला फत्ते हरगिज नही देगा!

**हाफीजरहमतः**—सादुल्लाखानजी! दिल्लीची मुसलमीन सलतनत काफीरांच्या हातीं पडायची बाकी का अुरली आहे? दिल्लीला काफीरशाही आज झालीच आहे. नजीबखान, बंगषखान, मरणी गेले, अेक लाख पठाण रोहिला मराठ्यानी दिल्ली दुआबांत साफ कापून काढला; पण जे तुमचे देवदूत खुदाताला-कडून लढावयास येणार होते त्यांचा पत्ता लागला नाहीं. बेशक खुदाताला, आजकाल मूर्तिपूजकांचा कैवारी झाला आहे. आणि ह्मणूनच मूर्तिभंजक हे आह्मी मुसलमानच त्या मराठी सिंहापुढे केवळ कोल्हे बनलों आहों! ( दुर्बीण लावून ) सादुल्लाखा, देखीये, फेर आगे बढे! मरहट्टे फेर आगे बढे!

**सादुल्ला०ः**—गोलंदाज क्या देखते हो! डागा, तोफा डागा. शंभर शंभर तोफांची आग अेकदम कडकवा—भडकवा—भाजून काढा दुष्मनाला! ( तोफा सुटतात. ) ( दुर्बीणीनें पहात ) कैसे सैतान है ये मराठे! ही सारी भयंकर आग पीत चढून येताहेत!

**अेक जमादारः**—(प्रवेशून) जनाब, सरदारसाब! अुधरकी बात छोडो! पहिले अिधरकी देखो! मराठ्यांची ती मुख्य फौज घेअून सरदार बिनीवाले तिकडे गंगा अुतरत असतां आपली सारी फौज तिला तोंड देण्यांत गुंतली आहे असें पाहून महादजी शिंदे अेका चोर-अुतारानें गंगा अुतरून आपल्या पिछाडीवर अकस्मात येऊन कोसळला आहे! अिधर अिस बाजू देखो! मराठोंका जबरदस्त बादलका बादल चढ आया है! घासके माफक रोहिलोंको मराठी समशेर काट रही है!

( अितक्यांत हरहर महादेव करीत महादाजीची सेना अेका बाजूनें येते, युद्ध जुंपतें, तोफा सुटतात, मराठे आल्या बाजूस किंचित हटतात तोंच मुसलमानाच्या मागचे बाजूसही हरहर महादेवाच्या गर्जना अुठून यशवंतराव, बिनीवाले, ससैन्य येतात. मुसलमान दोन्ही मराठा फौजांच्या कचाटींत सांपडतात. युद्ध सरमिसळपणें दोन्ही दळे अेकवटून घुमूं लागतें. रणशिंगें वाजतात. वेडी सर्वामध्यें डमरू वाजवीत नाचत गाते, "सोनपत पानपत, तुमची आमची गेली पत, पादशाह हिंदुपत, घ्या घ्या सूड! भाअूंचा सूड! दत्ताजींचा सूड! पानपतचा सूड!" )

**वेडीः**—( मध्येंच अेकदम थांबून ) सांपडला ग बाअी सांपडला! हाच तो सादुल्ल्या! आह्मां मराठी स्त्रियास पानपतीं भ्रष्टविणारा! पळाला! धरा! ( असें किंचाळत सादुल्ला पळून गेला त्या दिशेस धावत जाते तोंच मसलमानात "भागो भागो" ही आरोळी अुठून काहीं शिपाअी व हाफिज रहमत पळतो. काहीं पडतात. मराठे बातेऱ्यावर चढून तोफावर भगवे झेंडे लावून हरहर गर्जतात. )

**बिनीवालेः**—भले वीर! शत्रूंचा सप्पा अुडविलात! सरदार कानडयांच्या मागें श्रीमंतांनीं आह्मांस सरसेनापति पदावर नेमलें त्याचें आज तुमच्या पराक्रमें चीज झालें.

**महादजीः**—सर सेनापति, सरदार बिनीवाले, हेंच ना तें रोहिलखंड! पानपतच्या वैऱ्यांचें, त्या नजिबाचें, हाफिजाचें, सादुल्ल्याचें, रोहिल्यांचें हेंच ना तें रोहिलखंड? आज मी त्याच रोहिलखंडाच्या छातीवर ही मराठी तलवार अशी खुपसून उभा आहें! वीरहो, जा! मराठी लूट नि ललना, श्री नि स्त्री, बंदींत असेल तें घरघर जाळून टाका! गडगड धुळीस मिळवा! गांवगांव

कापून काढा—पानपतच्या लढाईचें नांव घेतांच मराठ्यांस मान खालीं घालायास न लागता रोहिला पठाणच त्या पानपतच्या नांवासरशी थरथर कापू लागावा असा पानपतच्या लढाईचा सूड उगवा!

**बिनीवाले:**—पण तरीहि तें सर्व सावधपणें, मागें पुढें पाहून पाऊल टाकीत, साधलें पाहिजे! कारण रोहिल्यांची दुसरी जबरदस्त फौज फत्तरगडी मोठा नेटाचा मोर्चा बांधून उभी आहे. त्यातही तो नीच सादुल्लाखान—ज्यानें पानपतीं मराठी स्त्रियावर मुख्य हल्ला केला, तो अधम आज आपल्या हातांतून निसटला आहे. त्याचा बळी मला पाहिल्यानें हवा! जो कोणी मराठा वीर त्या सादुल्ल्यास जिवंत पकडून किंवा त्यांचें शीर छाटून आणील त्यास मी गजांत लक्ष्मीचा मानकरी करीन! चला, शहाजणें शृंगें जय वाद्यें वाजवीत त्या फत्तरगडाचे रोखेंच चला! ( हरहर महादेव गर्जत सारे चालूं लागतात. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश २ रा.

**सुनीति:**—अग पण ह्या फत्तरगडावरील मुसलमानाच्या हालचालीची जी जी गुप्त बातमी त्या हेरास मी तुझ्याहाती धाडतें ती ती अगदीं रावराजे यशवंतरावाच्याच हातीं पडते ना? का आपली दुसऱ्या कोणा तरी अलबत्या गलबत्याच्या?

**अम्मा:**—अग अस कसं होईल? तो रावराजाचाच अगदीं स्वतःचा हेर आहे.

**सुनीति:**—अम्मा, पण माझें खरें नांवबिव तर तूं त्या रावराजांच्या हेरापाशीं बोलली नाहींस ना? हो, नाहींतर माझें कौतुक व्हावें ह्मणूनच असलें कांहीं बोलायचीस हो!

**अम्मा:**—नाही ग, तूं सांगितलंस तितकंच रावराजांना मी कळविलं आहे की कोणी अेक मुसलमानांच्या हातांत पडलेली आणि सादुल्लाखानाची पट्टराणी झालेली दुर्गावती नांवाची मराठी स्त्री मुसलमानी हालचालीचीं सारीं गुपितें माझ्या तोंडून कळवीत राहणार आहे. त्या कोणच्यातरी मराठी स्त्रीस भेटतांच

गौरविण्याचें रावराजे ह्मणत होते हो: पण सुनीति, आतां तूं आपलें खरें नांव स्पष्टपणें सांगून कां बरं टाकूं नये ? आपली प्रियतमा परत सांपडल्याचा यशवंतरावांचा आनंद गगनांत मावणार नाहीं !

**सुनीति:**—कशावरून, कशावरून ! अम्मा, ती आपली प्रियतमा आज पतिततमा झालेली आहे हें कळतांच बहुधा त्यांचा क्रोध गगनात मावणार नाहीं—आनंद नव्हे ! अम्मा, त्या प्रतापी यशवंतरावाची ती प्रियतमा सुनीति त्यांच्यामतें पानपती मेली आहे तीच बरी ! ही पतिता सोनपती आपली अमंगळ छाया तिच्या स्मृतीवर पाडून तिला आतां विटाळूं अिच्छित नाही. जाअूं दे, तो विचारच नको ! तूं आपली मला वेढ्याची कालपर्यंतची माहिती माग ह्मणजे झालें. परवां आपण मुसलमानाचा तोफखाना ज्या बाजूस दुर्बळ आहे ह्मणून त्या हेरास कळविलें त्या बातमीचा मराठ्याना काहीं अुपयोग झाला का ?

**अम्मा:**—अग खरंच, विसरतच होते तें. अग काल सकाळपासून मराठ्यानीं आपल्या बातमीप्रमाणें ह्या फत्तरगडाच्या त्याच बाजूवर तोफाचा नुसता भडिमार अुडवून दिला ! त्या बाजूस आज मुस्लीम तोफा साफ बंद पडल्या आहेत !

**सुनीति:**—खरंच की काय ? अग मग येताच मला ही बातमी पहिल्या धडाक्यास द्यायची कां अशी मी विचारीत विचारीत कोरून काढल्यावर ? बरं मग सेनापति झबताखानाचा धीर कसा तसाच आहे का ? त्याच्या बायकाकडे सहज जातेस तशी जाअून आलीस का ? अगदी न विसरता महत्वाचें तेवढें सगळं सांगावं अम्मा ! विसरतेस भारी तूं !

**अम्मा**—हें ग काय तुझं सुनीते ! मी कधी ग काय विसरलें ? थोडी आठवण रहात नाहीं कधीं कधीं अितकंच, पुन्हा मेलं सगळंच महत्त्वाचं. हें पहिल्यानं सागावं तर तें राहून जातं : तें सांगावं तर ह्याचा विसर पडतो. मला नाहीं बाअी अेका दमांत सगळं अेकत्र सागता येत !

**सुनीति**—तसं नाहीं ग अम्मा. कावूं नकोस अशी. अग तूं जरी काहीही आणि कितीही विसरत असलीस ना तरी माणुमकीस मात्र कधीं विसरली नाहींस बरं ! बाकी सगळ्या गोष्टींची आठवण ठेवून माणुसकीस तेवढें विसरणाया या मेल्या राक्षसांच्या लंकेंत तूंच तेवढी मला माणूस अशी भेटली आहेस. माझ्या अयोध्येची ओळख पटविणारी बातमी आणणारी मूक मुद्रिका

झालीस! या तुझ्या सच्च्या हृदयाच्या अेका आधारावरच जितकें काम निभावेल तितकेंच मला निभावून घेतलं पाहिजे! अग, तें बघ सादुल्लाखान येणारसें त्या पहारेकऱ्याच्या हालचालीवरून दिसतें, तर कांहीं सांगण्यासारखी बातमी राहिली असेल तर चल चल चटकन सांगून टाक नि बाजूला हो!

**अम्मा**:—अग, खरंच सांगण्यासारखी बातमी ह्मणून काय विचारतेस–जी सांगायची तीच बातमी विसरून गेले! अेक, अगदीं गुप्त ठेव अं–यातील चकार शब्द कोणास ठाअूक नाहीं. अग–सरदार झबताखान काल रात्री अेका गुप्त भुयारातून पळून गेला! अगदीं त्याच्या बायकांतच ही कुजबुज चाललेली मी अैकली. अगदीं नक्की! आणि त्यानें सादुल्लासच आपल्यामागें ह्या फौजेचा सरसेनापति नेमलें आहे.

**सुनीतिः**—( टाळी वाजवून ) अम्मा काय ह्मणतेस तरी काय! अहाहा, जर तूं ह्मणतेस तसेंच घडलं असेल तर अम्मा हा सारा गड मी माझ्या अेका भयंकर फूत्कारासरशी अुडवून दिला–चक्काचूर करून टाकलाच ह्मणून समज! बाअी! काय अद्भुत, काय अघोर बेत हा माझ्या मनांत जुळत आला आहे. पण तरीही अम्मा आपण अितक्या अभागिणी आहोंत आणि हें कर्म अितकें अद्भुत आहे कीं घडल्यावरच तें घडलें ह्मणावें हें बरें! तोंवर मना, असे मनचे मांडे खात मूर्खासारखें वाचाळ होअूं नकोस तर शिळेसारखें निश्चल हो, सापासारखें छापेबाज हो, सैतानासारखें पापी हो–ह्मणजे देवासारखें देवाचें पुण्य कार्य साधूं शकशील!! आजचा रंग तर फक्कड आहे–अुद्याच्या पोटात काय आहे तें कोणी सांगावें!

**अम्मा**:—अग खरंच, तेच अचुक सांगणारी अेक चेटकी गडावर अेवढ्यातच कुठूनशी आली आहे. नांव विचारलं तर सांगते 'वेडी' ह्मणून. पण साऱ्या मुसलमानी शिपायांस नि अंमलदारासच तिनें वेड लावलें आहे. जाते तिथे मराठ्यास शिव्या देत फिरते. तिला कोणी अडवीत नाहीं अुलट जो तो तिला हात दाखविण्यास धडपडतो आहे! कारण भूतभविष्य ती अशी नेमकी सांगते ह्मणतेस कीं यंव! अग हो, विसरतच होतेः ती माझ्या सारखी पाठीस लागली आहे कीं मला सादुल्लाखानाकडे घेअून चल ह्मणूनः काल तर ती थेट या महालाच्या जिन्यापर्यंत येअून गेली.

सुनीतिः—अम्मा, अम्मा, सादुल्लाखान येतो आहे–जा जा,

(अम्मा जाते.)

सादुल्लाः—(प्रवेशून) सोनपती! अफसोस! अै मेरे प्यारी, पानपती अफसोस, अफसोस! मेरी जान खतरेमें है! बचाव, बचाव, आज ही माझी पोलादाची समशेर बोथट झाली–आता मला वाचवील तर माझी ही प्रेमाची समशेर–ही माझी प्यारी सोनपतीच काय ती वाचवूं शकेल! सोनपती, तूं शपथेवर मला त्या दिवशीं वचन दिलं होतंस ना की तूं माझ्या विश्वासाचा आणि प्रेमाचा केव्हाही घात करणार नाहीस ह्मणून?

सुनीतिः—जी हा, सादुल्लाखानसाहेब, ज्या विश्वासानें आणि प्रेमानें आपण मला आजवर वागविलेंत तशाच विश्वासानें आणि प्रेमानें मी आपल्याशी मरेतों वागेन! बोला, आज असें नवीन संकट कोणचें गुदरलें? नि मी त्यांतून आपणास वाचविण्यासाठी काय करावें?

सादुल्ला—सुन, प्यारी, सुनः नजिबाच्या पुत्रानें, झबेताखानाने, नि मी या फत्तरगडीं जबरदस्त मोर्चा बांधला. मराठयांनी वेढा घातला तरी परवापर्यंत गोळयांच्या माराखालीं त्यास तसूभरही पुढें सरकूं दिलें नाही. पण परवापासून आमची कच्ची बाजू तीच कशी काय की पण मराठ्यानी नेमकी ओळखून त्यानी काल तिकडच्या आमच्या तोफा साफ बंद पाडून तटास मोटमोठी खिंडारें पाडली. त्यासरशी घाबरून काल रात्रीं झबेताखान–आमचे मालिक आणि सरसेनापति–अेका गुप्त भुयारानें किल्ल्यातून निसटून जीव घेअून पळून गेला!

सुनीतिः—काय, या फौजेचा मालक झबेताखान, त्या बहाद्दर नजीबखानाचा हा बहाद्दर पूत मराठ्यास भिऊन पळून गेला? नि येवढी मोठी बातमी मला अजून कळली देखील नाहीं?

सादुल्लाः—प्यारी, तुला तर काय, पण ही बातमी माझ्यावांचून कोणासही अजून कळली नाही ह्मणून तर माझ्या जगण्याची अजून आशा आहे. त्यानें जातांना या फौजेवर मला मुख्य सरसेनापति नेमले आहे असें मला सांगितलें, नि साऱ्या सरकारी किल्ल्या मजपाशी दिल्या नि मरेतों किल्ला झुंजीव ह्मणून आज्ञापून तो चालता झाला! मालक तो, कितीही नामर्द निघाला, तरी त्याच्या तोंडावर त्याची आज्ञा मला कशी तोडतां येणार? मी हो ह्मटलें. पण रोहि-

त्यांचे हे सारे मातबर सरदार ज्या मराठ्यांपुढें शेपट्या घालून रानावनांत पळून गेले तिथे मी अेकटा मराठ्यांस पुरा पडणें शक्य नाहीं हें मला आतां पुरतें कळून चुकल्यामुळें मीही आता माझा जीव त्याच रीतीनें वांचविण्याचा निश्चय केला आहे ! प्यारी, अजूनही मला मरणाचें भय वाटत नाहीं—पण मला आतां मराठ्याचें भय वाटतें ! ह्मणून आजच्या आजच मीहि त्याच भुयारानें पळून जाणार !

सुनीतिः—अच्छा, आपकी जान अिस तरह बचानेमे मै आपको क्या मदद कर सकती हूं ?

सादुल्लाः—वही तो मै तेरेको अभी बतलाता था. प्यारी सोनरती, तें भुयार झबेताखानासच माहीत होतें, तें त्यानें पळतांना माझें सहाय हवें ह्मणून मला दाखविलें; तें मी आता तुला—माझ्या प्राणसेभी प्यार्‍या सोनपतीला—दाखवीन. त्या भुयाराचें बाहेरचें तोंड या किल्ल्यापासून दूरवरच्या अेका झाडींत अुघडतें. त्याच रानीं माझे जिवाचे शेंसव्वारों अनुयायी दबलेले असतात. मी त्यास घेअून गुप्तपणें माझ्या जहागिरीस जाणार—हे साधेतों दोन दिवस तूं ही बातमी फुटूं देअूं नकोस. मी तुझे महालात आजारी आहे असें भासीव. मग मी माझ्या खालचाच अधिकारी पोलादखान यास सरसेनापति नेमल्याची माझी चिठ्ठी नि मी देतों त्या खजिन्याच्या दारू कोठाराच्या वगैरे किल्ल्या त्या पोलादखानास स्वतःच पोंचवून दे आणि आरडाओरड कर की त्या सर्व वस्तु तुझ्या महालात टाकून मी तुलाही न कळत कुठे नाहीसा झालों ! मग संधी साधतांच तूंही त्याच भूयारातून निसटावें, नि मला येअून मिळावें ! तिकडे आपल्या छोट्याशा जहागिरीवर आपण प्रेमाच्या स्वर्गात पुन्हा नांदूं लागूं ! तबतक, औ मेरी प्यारी, अिस मुसीबतका सामना—

सुनीतिः—मै बडे खुपीसे करूंगी ! आपण कांहीं अेक संकोच मानूं नये.

सादुल्लाः—आहा ! तूं काफरोंकी छोकरी होकेभी अब मूझे किसी देवताके माफक दिखाअी पडती है. ही बघ रात्र पडत चालली. मध्यरात्रीं तुझ्या मेण्यांत बसून मी तुला सोडणार ! तुला सोडणें—हाय हाय प्यारी, माझं हृदय या विचारसरशीं कासावीस होत आहे ! आव प्यारी आव, तेरे आलिंगनसे मेरी प्राणोकी प्यास आज दिन तो तृप्त कर दे ! मेरे गलेमे तेरे सुनहरे बाहु

प्यारसे लपेट दे !

( तिला असें बोलत तो आलिंगून घेत आहे तों त्या शेवटच्या वाक्याचे वेळीच जिन्यांतून वेडी–केस विस्कटलेली, मूठ वळलेली, भयंकर दिसत असलेली येते नि अेका अंधेऱ्या कोपऱ्यांत निश्चल अुभी राहून डोळे वटारून तें सारें पहात राहातें. )

**वेडीः**—( स्वगत ):–काय ! हें मी काय पहात आहें ! ही माझी मेलेली मुलगी ? का तिंचें पिशाच्च ! माझी सुनीति–सादुल्ल्याच्या गळयात पडलेली; तुळशीपत्र नरकाच्या कुंडात ! आणि ती चाडाळीण तरीहि जिवंत !

**सुनीतिः**—( वेडीच्या कोपऱ्यात दृष्टी जातांच दचकून ):—तें ? काय दिसतें आहे मला ? बाअी ! कोण ? माझी मेलेली आअी ! का माझ्या हृदयात निवसत असलेली, पण आता माझ्या पापाचरणानें चिडून माझ्या हृदयाबाहेर निघून जाणारी, तिची ती संतप्त स्मृति ! ( सादुल्ल्यास ढकलून ) अरे सोड बघ, मागें बघ; डोळे कोण वटारतें आहें तें–तुला नाहीं दिसत ?

**सादुल्लाः**—या अल्ला ! यह कौन ? कुअी सैतानी आफत, या कुअी पागल औरत, या जिसके डरसे मै भागना चाहता हूं वही मेरी खुद्द मौत ? बोल तूं कौन अदमी या भूत ? अैसी चुपचाप खडी क्यों ? तुला कोण हवें आहे?

**वेडीः**—( दात खाअून दाबलेल्या आवाजात अेकेक शब्दासरशी अेकेक पाअूल पुढें टाकीत )तूं ! मला तूंच हवा आहेस ! पानपती ज्या माझ्या नि माझ्या मुलीच्या केसास धरून आह्मास फरफटत ओढलेंस, ( पंजे विस्फारीत मोठ्यानें ) सादुल्ल्या, त्याच केसानें तुझा गळा कापला घे ! ( थरथरत्या सादुल्ल्यावर अेकदम झडप घालून गळा दाबून, झटापटीत मंचकावर पाडून, खंजीराचा वार करते. पुन्हां वार करणार तोंच वेडीचा हात सुनीति धरते )

**सुनीतिः**—आअी ! तूं माझी जिवंत आअी अस अथवा तिचा मृतात्मा अस: मी तुझी मुलगी आहे, मी तुझी सुनीति आहें ! पानपतां मी घायाळ होअून पडल्यानंतर या राक्षसांनीं मला अिथें आणली. आअी—

**वेडीः**—चुप ! जीभ छाटून टाकीन मला आअी ह्मणालीस तर. तुझी आअी नि तुझे वडील पानपतीं मेले, पैकीं तुझ्या वडिलांचा आत्मा सूड झाला नि आअीचा वेडः नि आमचें पुन्हां लग्न लागलें. तें वेड मी नि तो सूड



**सादुल्लाखान:**—या अल्ला ! यह कौन ? कुअी सैतानी आफत या कुअी पागल औरत या जिसके डरसे मै भागना जाहता हूं वही मेरी खुद मौत ! [ पृष्ठ. ७६ ]

माझा पति. त्या माझ्या पतीच्या नांवाचं, सूडाच्या नांवाचं, कुंकूं मला लावायचं पण त्या कुंकवाचा करंडाच कुठें सांपडेना. तो हा आतां सांपडला. ह्या राक्षसाच्या हृदयाच्या करंड्यांतील हें लालभडक कुंकूं असें ह्या खंजिराचे नखानें कोरून भरला बघ हा मळवट–( तिचा खंजीर सुनीति झटपटींत हिसकावून घेते )–झालं माझं काम–जातें मी आतां ! नि तूं ? ज्यानें तुझा बाप मारला, आओचा गळा घोटला, त्याच्या गळ्यात पडून सुखानं नांद अं ! सोनपत, पानपत ! सोनपत, पानपत !( अशा तालावर पाय आपटीत जाऊं लागते; तोंच तिला धरून– )

**सुनीतिः**—हाय हाय ! आओी ! पळभर तरी थांब ! जी कधीही भेटणार नाहीं ह्मणून मी झुरत होतें ती तूं माझी नाहींशी झालेली आओी मला अशी अकस्मात भेटली असताही मला पोटाशीं अेकदां तरी घेतल्यावाचून पुन्हा नाहींशी होऊं नकोस !

**वेडीः**—दूर ! जीव घेअीन, दूर !

**सुनीतिः**—घे, आओी, जो तूंच मला दिलास तो हा जीव तुझाच आहे. मी ह्मणजे तुझा जीवनाच्या दुधाच्या गंगेतील अेक घोटभर दूध ! त्या गंगेतील तें चुळकाभर जीवन घेऊन मी तींतच त्याचें अर्घ्य देतें, घे ! जीव घे पण आओी, मला अेकदा भेटूं दे ! ( वेडीला कडकडून मिठी मारते. वेडी स्फुंदत तिच्या हनुवटीस धरून—— )

**वेडीः**—पण बाळे, तूं हें अघोर पापाचरण का करीत राहिलीस ! नको, भिऊन दूर सरूं नकोस. बाळे, बाळे तुझ्या या मऊ ओठाचा स्पर्श होतांच माझ्या हृदयास प्रेमाचा अुमाळा येण्याची झालेली संवय अजून सुटली नाही. ये माझ्या पाडसा, तो प्रेमाचा पान्हा पुन्हां पळभर पी ये !–पण–पण–नको ! मागें हट ! सुनीते, तूं मला स्वर्गात सांपडशील ह्मणून मी शोधावयास निघालें तों तूं येथें नरकांत पचतांना दिसलीस अं !

**सुनीतिः**—आओी, दहा वीस दिवस आणखीं थांबः माझ्यावर विश्वास ठेव. आज माझें नि या नीच सादुल्लयाचेंही जीवन आपल्या हिंदुपदपादशाहीस आमच्या मरणाहून सहस्रपटीनें अधिक अुपयोगी आहे. ह्मणूनच तुला मी या नीचाला येथल्या येथेंच ठार मारूं दिलं नाहीं. तीन दिवसांनीं तुला मी कां

वाचले नि याला का वाचविले तें कळेल नि मग तुला कळेल तसें तूं मला ठार मारण्यास मोकळीही होशील. ( सादुल्ला कण्हतो ) बघ तो शुद्धीवर येत आहे. जा सध्यां जा, या गडाखालीं मी लावीत असलेला सुरुंग तुला अिथ अुभी असतांना पाहून वाहत असलेल्या माझ्या डोळ्यांतील पाण्यानें सादळेल. जा पण आअी पुन्हा मला भेट अं, भेट अं !

**वेडी**:—( जातां जातां ) भेटेन. पण तूं हिसकून घेतलास तसाच दुसरा खंजीर हातीं घेअून ! जर जें बोललीस तें खोटें ठरलें तर पुन्हां सोनपत ! पुन्हां पानपत ! पुन्हां सोनपत ! पुन्हां पानपत ! ( असें तालावर बडबडत नाचत जाते. )

**सादुल्ला**:—अया या या ! सोनपती ! माझा प्राण भयानें कासावीस होत आहे. या गडाबाहेर मला याक्षणीं काढून देशील तरच मी जगलों तर जगेन !

**सुनीति**:—घाबरूं नका खानसाहेब ! कृत्येसारखी ती घोर आकृति, निघून गेली. तुमचा घाव मी आत्ताचे आत्ता स्वतः औषधी करून बांधते. ( घाव बांधित ) आतां सरदारजी, मी आपल्याला भुयाराकडे नेण्यास मेणा आणवितें तोंवर आपण आंत पडून राहावें. अम्मा आपली शुश्रूषा करील आणि तें पोलादखानास द्यावयाचें पत्र नि त्या भुयाराच्या, दारूकोठाराच्या, खजिन्याच्या वगैरे किल्ल्या—जें काय मजपाशीं द्यावयाचें तें मात्र लगेच द्यावें.

**सादुल्ला**:—माझ्या खास महालांत जा. ह्या किल्लीनें तेथील संदूक अुघड त्यांतील किल्ल्या घे, तोंवर मी पत्रही देतो. ( सादुल्ल्यास खोलीत पोंचवून सुनीति पुन्हा प्रवेशते. )

**सुनीति**:—(स्वगत ) कोण सोअिस्कर संकट येअून गेलें हें आत्तां ! जर का हा सादुल्ल्या अिथेंच ठार मरता तर त्याच्यापासून तें पत्र नि किल्ल्या माझ्या हातांत पडत्याना. बरं हा अगदींच जिवंत निसटता तरीही ती मनाला चुटपुट लागती. पण हा अर्धमेला तेवढा झाल्यानें दोन्ही कार्यें झालीं. ह्या घावांतून हा आतां सहसा जगत नाहीं. बाहेर जाअून कुठेंतरी मरणार ! नि हेंच बरं झालें. आंत मरता तर मीच मारला ह्मणून बोंब होअून माझे राअी राअी तुकडे हे रोहिले अुडवते. पण आतां दोन तीन दिवसांनीं संधि येतांच त्याचे स्वतःचे हातचें पत्र पोलादखानास दिलें कीं सादुल्ल्या स्वतःच पळाला असें होअून मी नामानिराळी राहूं शकेन. नि माझा पुढचा अघोरबेत पार पाडीन ! अेकंदरींत

ठरलेली वाट जुकून भलत्याच वाटेस लागल्यामुळेंच अधिक वेगानें मी माझ्या अिच्छिलेल्या ठिकाणी अपेक्षिताहूनही अचुक अेअून पोचल्यें खरी !

॥ पद १२ ॥

हा अघोर बेत घोर संकटा निवारी । गे ।
शिवसम विष कंठिं, शिरीं गंगा उपकारी ॥ ध्रु ॥
पापाच्या पुण्यबला ।
अेकवटुनि मी अबला ।
अेकटि ह्या दशसहस्र दैत्यबला मारी ॥ १ ॥

---

## प्रवेश ३ रा.

कोंडण्णाः—( अिकडे तिकडे पाहून ) काल ह्या झाडीत अेका टेहेळणी करणाऱ्या मराठ्यांच्या टोळीशी जिवाच्या भीतीनें छपून राहिलेल्या मुसलमानांच्या अेका तुकडीची चकमक झडली ह्मणतात तें खरेंच असलें पाहिजे. ही पहा रोहिल्यांची पळता पळता पडलेली प्रेतें ! आ ? या प्रेताच्या गळ्यांत हें काय चमकतें आहे ? रत्न कीं काय ? पण हो हा मेलेला मनुष्य अजून प्रेतावस्थेंतच आहे ना ? कां सुरवंटासारखा प्रेताच्या कातेंत पचून भूत होअून बाहेर पडण्याच्या बेतात आहे ? ( खडे मारून पाहून ) छे: हें अगदीं निश्चेष्ठ प्रेतच आहे. ( जवळ जाअून गळ्यांतील कंठा काढून ) रत्नाचा कंठा नि ही हिऱ्याची आंगठी ? ह्मगजे कालच्या चकमकींत मराठ्यांकडून नकळत कोणी अेखादा मोठा रोहिला सरदार मारला गेला की काय ? आंगठीवर नांव तर नसेल ? काय ? सादुल्लाखान ! मराठ्याचा पानपतचा कट्टर शत्रू ! ज्याचें शीर कापून आणणारास गजान्तलक्ष्मीचें वतन देण्याची सरसेनापतीनीं दवंडी पिटली आहे—त्या सादुल्ल्याचें हें प्रेत ! नि आतां त्याचें शीर कापून नेअून त्या गजान्तलक्ष्मीचा लक्ष्मीकांत मी होणार ! विश्वास देखील बसत नाहीं असें असंभाव्य भाग्य चालून आलं आ माझ्या पायाशीं ! हं, चल तरवारी, पड माझ्या म्यानातून बाहेर. संभाळ, रे दुष्टा सादुल्ल्या, संभाळ ! शिरच्छेदाच्या भयानें तूं मृत्यूच्या दाढेंत शिरला असलास तरी मी तुला त्या मृत्यूच्या दाढेंतून ओढून

तुझा शिरच्छेद करणार. तेव्हा छाती असेल तर अुठ नि द्वंद्वयुद्धास सिद्ध हो. कारण मी प्रेताचें शिर देखील लढल्यावाचून छाटणार नाही. आणि प्रेताशीं-देखील त्याला आधीं सावध केल्यावाचून अधर्मानें लढणार नाही ! हं, आलो !— हरहर महादेव ( त्याचें शीर छाटून ) अहो चराचर हो, साक्षी व्हा ! मी पान-पनचा सूड घेतला ! मी सादुल्लाखानास भयंकर द्वंद्वयुद्धात ठार मारिलें ! हरहर अरे पण मी अितका ओरडतों आहे तरीहि हा घोंडण्णा, मजबरो-बर येअून ह्याच झाडींत भटकत असणारा, ह्या माझ्या शौर्यास साक्षी व्हाव-यास अजून कसा धांवला नाहीं ! 'काय झालें काय' म्हणून विचारावयास दुसरें कोणी चिटपाखरूंसुद्धा येत नाही ! ( तोंच पडद्यात भागो, भागो, मराठे आये, आये, मराठे ! असा गलका होअून मुसलमानाची झुंड येते. )

**कोंडण्णा:**—( घाबरून तें शीर तेथेंच टाकून ) काय ! हे तर मुसलमान ! प्राणावर बेतते की काय ? बापरे, हे तर अिकडेच येताहेत. पळूं तर पकडलों जाअीन. ठाम अुभा राहूं तर ठारच मरेन. तेव्हा प्रेत होअून प्रेतात पडून राह-ण्यावाचून सुटका नाही. पुढें पुष्कळ जन्मजन्मांतरें आता थोडें मरणेंच प्राप्त आहे. ( प्रेतात पडून रहातो. )

**पहिला मुसलमान:**—आये ! मराठे आये ! भागो—

**दुसरा ,,** :—लेकिन किस तरफसे आये यह तो कहो, किस तरफसे भागें ?

**पहिला ,,** :—अबे चारो तरफसे आये अिस लिये चारो तरफसे भागो ! अभी सुना नही तुह्मने अुनका हरहर महादेव !

**तिसरा मुसलमान:**—लेकिन मरहट्टे कल अिधरसे पचास मैल दूर चले गये थे ना ? क्या अुनका हरहर महादेव पचास मैल दूरसे सुन पडता है ?

**पहिला मुसलमान:**—बेशक ! अबे भोला मरेठे पचास मैल दूर है तोही जो भागता है वोही बचता है. सुना है की मरेठोके घोडोको पंख रहते है पंख !

**कोंडण्णा:**—अरे देवा ! हे ढकला ढकली करीत आता माझ्या छातीवर पाय देणार ! अरे बापरे, भयानें ओरडल्यावाचून आता माझ्याच्यानें चूप रहावत नाहीं ( अितक्यांत त्या पळत्या झुंडीपैकीं अेकाचा पाय त्याच्या पायावर पडतांच मोठ्यानें ओरडून अुठतो ) अयायाया ! नाही, नाहीं, मी नाहीं त्याचें

शीर कापलें ! मी अेक प्रेत आहें ! मी कसें दुसऱ्या प्रेताचें शीर कापीन ! मला असंच शांत पडूं द्या, नाहीं तर मी प्रेताचं भूत होअीन भूत ! ( बसकन दांत दाखवितो. )

**सर्व रोहिले:**—भूत ! भूत ! पानपतके गुस्सेसे मरे मरेठेभी भूत होके रोहिलोंको खाते है ! सुना है ना की फत्तरगडमें सादुल्लाखानकोभी अैसेही कुअी मराठी भूतने झपेटा था ! भागो ! भागो ! ( सर्व दशादिशा पळतात. )

**कोंडण्णा:**—भ्याड कुठले ! मला भिअून सगळ पळाले ! माझ्या नांवाचा वचक साऱ्या रोहिलखंडभर अितका बसला आहे हें माझ्या ध्यानींमनीही नव्हतें. तरी मी स्वतःच घाबरलो होतों. पण जर कां हे दोन्ही पराक्रमी हात असे जोडून धरण्याचे ठायीं त्यांत दोन पट्टे घेअून असा रणाचा थयथयाट घालूं लागतों तर--तर काय ! सारें रोहिलखंड मी अेकटा जिंकतों ! आं ? हे कोण ? हं ! कोणी मराठा बारगीर ! आणि भोळसटसाच दिसतो ! माझ्या पराक्रमास हवा तसाच साक्षीदार देवानें धाडला खरा बुवा !

**मराठा:**—( दबकत पुढें येअून ) काय हो आतां आरडाओरड झाली ती अिकडेच की काय ? आपल्या मराठयांचा मी अेक निरोप्या अिकडच्या टोळीस निरोप पोचवून वढ्याच्या तळाकडे परतत होतों तोंच हरहर महादेवचा नि भागोभागोचा मोठा गलका अैकला. कित्येक मुसलमान पळताना पाहिले. आपण मराठे--आपण दिसतांच अिकडे वळलों !

**कोंडण्णा:**—ह्मणजे तूं युद्ध असें पाहिलेंच नाहींस की काय ? वेड्या, तो हरहर महादेव गर्जणारा मी--हा अेकटा मराठा वीर आणि झाडीत लपलेली शेंसवाशें रोहिल्यांची ती अेकजात हत्यारबंद टोळी मजवर दिन दीन करीत अचानक तुटून पडली ! गदा गोफण तोमर तरवार बाण बंदुक--हत्यारांची नुसती घे घे मार अुडाली. मी रक्तानें नुसता न्हालों-.पण टीचभर न हटतां कणसें कापावीं तशी शत्रूची कत्तल अुडवीत चाललों नि शेवटीं--काय ? शेवटीं काय ? अैक, नीट सावरून अैक--हें शीर छाटून टाकलें ! कोणाचें ? गड्या सेभाळ ! त्या भयंकर शत्रूचें नांव घेताच दचकून मटकन खालीं बसशील ह्मणून--हं अस्सा--ताठ होअून अैक ! महादजी शिंदे, विनीवाले, होळकर, बर्वे, स्वतः पेशवे ज्याचा शिरच्छेद करूं शकले नाहींत त्या ( मोठयानें ) सादुल्लाखानाचें हें शीर मी अफजुलखानासारखें भीम भयंकर द्वंद्वयुद्धात साफ कापून काढलें. तेव्हां त्या शेंकडों शत्रूंतील अुरले सुरले हजारों शिपाअी गर्भगळीत होअून भागो भागो करीत दशदिशा पळाले. अैकलेंस ना तें तूं ? पाहिलेंस

ना तें सांर ? शाबास ! सरसेनापतींसमोरही असें खरें बोलत राहिलास तर तुझ्या या साक्षीसाठीं मी ह्या लुटींतील हीं दोन रत्नें तुलाही पारितोषक देअून टाकीन.

**मराठा**:—जी हुजूर. बाकी सारें तसेंच सांगतों, पण आपण या भयंकर लढाअींत रक्तबंबाळ झालेत ह्मणून ह्मणता तेंही तसेंच सांगूं का ? कारण आपण तर रक्तानें लालभडक झालां नसून घामानेंच काय ते चिंब झालेले आहां !

**कोंडण्णा**:—वेड्या, घाम ? हा घाम का निथळत आहे ? अरे, मनुष्या-प्रमाणें त्याच्या रक्ताचेही सात्विक, राजसिक नि तामासिक असे तीन प्रकार असतात. तामसी वीरांचें रक्त काळसर, राजसीक वीरांचें तांबडसर, नि माझ्यासा-रख्या सात्विक वीराचें रक्त पांढरसर, गंगाजलाप्रमाणें शुभ्र असतें. कारण सत्वाचा रंग निर्मळ शुभ्र. त्याला बेटा घाम समजला ! कोण घोंडण्णा ? वा, मजवर गुदरलेल्या भयंकर संकटाचे वेळीं तोंड लपवून भ्याडा, आतां अिथें येतोस काय !

**घोंडण्णा**:—हां: कोंडण्णा, आतां तोंडाची जास्त वाफ न दवडशील तर झालें हें सारें शोभून जाअील. मीं सगळें कांहीं पाहिलें आहे. मला माहीत—तुला माहीत. दोघांस हा तिसरा साक्षीही हवातसा मिळाला आहेच. पण हें जें अचा-नक घबाड तुझे हातीं लागलें आहे ना तें पचवायचें तर तूं शेंकडों, हजारों, लाखों हे सारे अगडबंब शब्द सोडून तुझ्या जिभेचा विदुषकी पट्टा आवरला पाहिजेस. सरसेनापतींना तुझा पराक्रम तूं असा मोकाटपणें न सांगतां मला मोजकेपणें सांगूं देशील तर बिनतोड डाव साधेल: नाहींतर बाधेल ! कारण तूं भाग्यवान आहेस खरा—पण बुद्धिवान नाहींस ! सुलक्षणी पण शंख !!

**कोंडण्णा**:—हं घोंडण्णा, तोंड सांभाळून बोल. शंख, शंख ह्मणून मला ह्मणतोस पण ध्यानांत धर देवाच्या पूजेआधीं शंखाचीच पूजा करावी लागते. प्रत्यक्ष गीतेचा पहिलाच अध्याय ह्मणजे निर्भेळ—शंख महात्म्यच नव्हे काय ! कृष्णानें पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त, भीमानें पौन्ड्र, शतशः वीर महावीर ‘ शंखान् दध्मुः पृथक् पृथक् ’ ! अनेक वेळा देवानीं माझ्यासारख्या शंखांना हातीं धरले ह्मणूनच देवाचीं देवकार्यें पार पडलीं.

**घोंडण्णा**:—पण त्या शंखास देवच फुंकीत ह्मणून ! शंखच शंखांना फुंकूं लागते तर देवानादेखील शंख करण्याची वेळ येती शंख ! ह्मणून ह्मणतों तुला फुंक-ण्याचें काम तूंच करूं नकोस—तें मला करूं दे, ह्मणजे अुद्यां यावेळीं तूं गजान्तल-क्ष्मीचा धनी होशील—हत्तीवर मिरवला जाशील, त्या वेडीचें भविष्य खरें ठरविशील !

**कोंडण्णा!**—अरेरे, चांडाळा! हें काय अशुभ वाक्य तूं या शुभकार्यी अुच्चारलेंस! हत्तीवर बसण्याचा हा योग जर तिच्या भविष्यानें यावयाचा असेल तर बाबा मला तो नि ती हत्यान्त लक्ष्मी न मिळाली तरी चालेल. कारण मग त्या चेटकीचें तें त्यानंतरचें दुसरें भयंकर भविष्यही खरें ठरूं पाहील! मी नि तूं शेवटीं धडधड पेटूं लागूं—जळूं लागूं. धोंडण्णा मला कापरें भरतें रे तें आठवतांच!

**धोंडण्णाः**—अरे त्या भविष्यांत विशेष तें काय! अरे शेवटीं ह्मणजे चित्ते-वर—मेल्यावर सगळेच तसे जळतात! चल भिअूं नकोस, हें सादुल्लाचें शीर तुझी कामगिरी, हा निरोप्या तुझा साक्षी, नि मी तुझा वकील! चल; सर-सेनापतींना हा अमोल नजराणा देअून तूं हो सरदार नि मी तुझा—कोंडण्णा—कारभारी! चल. (पडदा पडतो.)

---

## प्रवेश ४ था.

(फत्तरगडच्या वेढ्याजवळील अेक अेकान्त स्थळ.)

**अृषिकुमारः**—होय, अिथेंच फत्तरगडावरील सरदारांस मी आपली भेट होअील ह्मणून कळविलें आहे. गडावर मुसलमानांच्या बंदींत असतांही मराठ्यास आजवर गुप्त सहाय देणाऱ्या त्या देवी दुर्गावती नांवाच्या शूर मराठी स्त्रीनें कांहीं महत्वाच्या कारस्थानाची चर्चा आपणाशीं समक्ष करण्यासाठीं आज ह्या तिच्या अत्यंत विश्वासू सरदारावर ही जिवावरची कामगिरी सोंपविली आहे.

**रावराजेः**—हे अृषिकुमार, नांव देखील न सागता किंवा कपर्दिकही न मागता आपणही आजवर अशाच जिवावरच्या कामगिऱ्या अनेक वेळा बजा-वल्या आहांत!

॥ पद १४ वें. ॥

**लोकमंगलाला। झटत साधण्याला॥**
**संग सोडुनीया सारा। खरे साधु झाला॥ १॥**

**अृषिकुमारः**—ते पहा आलेच ते सरदार.

**सरदारः**—(प्रवेशून—स्वगत) अहाहा! माझ्या हृदयाच्या देव्हाऱ्यांतील हरवलेली देवमूर्ति ती हीच!

**अृषिकुमारः**—सरदारजी, आपण येतांच असे संकोचलेसे कां दिसतां? रावराजे यशवंतराव ते हेच.

**यशवंतराव:**—होय, सरदारजी, वीरांगना दुर्गावतीचा काय निरोप आहे? गडाचे भुयारांतून सादुल्ला पळाल्याची गुप्त बातमी त्यांनीं धाडली तिचे आधारें आमच्या अेका मराठी टोळीनें त्या झाडींत सादुल्लाला त्याच्या टोळीसह गांठून चोपला. त्या झटापटींत आमच्या कोंडण्णा नांवाच्या जहागिरदारानें जातिनिशीं द्वंद्वयुद्ध करून त्या रोहिल्या राक्षसाचा शिरच्छेद केला. त्या जहागिरदारास हत्तीवर बसवून आणि मराठ्यांच्या त्या हाडवैरी सादुल्लयाच्या शिरास भाल्यावर टोंचून मराठी सैन्यांतून मोठ्या थाटानें मिरविलें गेलें, हें आपणासही कळलेंच असले.

**सरदार:**—कळलें. पण त्या बातमीत चूक अितकीच कीं सादुल्लास द्वंद्वयुद्धात असें कोणी मारलें नाहीं. त्याच्या टोळीला मराठ्यांनी गाठतांच पूर्वी गडावर त्या मराठ्या स्त्री मारेकऱ्यानें केलेल्या घावें मरणोन्मुख झालेल्या सादुल्लयास तिथें टाकून, अुरले ते रोहिले पळाले नि त्याच घावें तो दुष्ट तिथें मेला. दुसरे दिवशीं त्या कोंडण्णानें योगायोगानें त्याचें प्रेत ओळखलें नि त्याच्या त्या प्रेताचें शिर छाटून तें आपण द्वंदयुद्धांत छाटलें म्हणून अिकडे सरसेनापतींकडे येतांच थाप ठोकली.

**यशवंत०:**—काय? त्या लुच्चानें सरसेनापतीसही असें चकवलें? त्याचे अंगी ही लबाडी लावून त्यास चांगलाच दंड केला पाहिजे! बरं रोहिले अजूनही गड झुंजवूंच म्हणतात काय?

**सरदार:**—होय! सादुल्ला मारला गेला हें कळतांच त्याचे मागें पोलादखान रोहिल्यांचा मुख्य सेनापति झाला. गड भक्कम, दारूगोळा भरपूर! जिवावर बेतलीच तर मराठ्यांच्या स्त्रिया गडावर रोहिल्याचे हातीं आहेत त्यांची कत्तल करून शेवटचा रोहिला पडेतों लढूं म्हणतो!

**यशवंत०:**—मग ह्या पेचांतून गडावरील मराठी स्त्रियाही वांचाव्या, मराठी लूटही आपल्या हस्तगत व्हावी आणि गडही आपले माणूस राखून तडकाफडकी घेतां यावा अशी अेखादी तोड आहे का?

**सरदार:**—आहे! नि तीच सुचविण्यास मी आज आपणाकडे आलों आहे आम्हीं सुचवितांच आमच्या वाटाड्या दाखवील त्या गुप्त भुयारांतून निवडक लोकांसह आपण अचानक रात्रीच्या गडद अंधारांत किल्लयांत घुसून छापा घालावा! दारू कोठारासुद्धा साऱ्या मर्मस्थानांच्या किल्ल्या दुर्गावतीपाशीं आहेत! आपण येतांच अेकच आग भडकवूं! हलहल्लोळ अुडवूं!! आणि त्याच संधीस मराठ्यांच्या ह्या अलोट सैन्यानें बाहेरूनही गडावर शेवटचा निकराचा हल्ला चढवावा.

**यशवंत०**:—ठीक ! ठीक ! ठरलें तर ! सरसेनापती विनीवाले यांनीं आपणाशीं योग्य तें तें कारस्थान चालविण्याचा आणि पार पाडण्याचा आह्मांस अधिकार दिलेला आहे. तेव्हां आपण देवी दुर्गावतीना कळवा कीं आपली सूचना येतांच तत्काळ मराठी सैन्य गडावर चढून आलेंच ह्मणून समजा. त्याचप्रमाणें हिंदुपतपातशाहीचे मुख्य प्रधान जे पेशवे त्या श्रीमंतांचेवतीनें दुर्गावतीस हाही निरोप आह्मीं धाडीत आहों कीं—श्रीमंत अतुल वरदानी दुर्गावतीसारख्या वीरांगनेच्या या सेवेचें सार्थक धनमान दानांही सेवकांच्या अिच्छेहून अधिक करतील ! तरी कांहीं अेक संकोच न करता देवी दुर्गावतीनीं अिच्छावर मागावा. स्वामी तो पुरविण्यास समर्थ आहेत !

**सरदार**:—रावराजे ! रावराजे ! हें आपण काय बोलून गेलांत. जें वचन श्रीमंताच्या साम्राज्य लक्ष्मीसही पुरविणें अशक्य तें वचन आपण कसें देता ! तो निरोप पोचविण्यास निदान मी तरी असमर्थ आहे ! कारण, महाराज, देवी दुर्गावतीला सैन्यातील वा राज्यातील कोणत्याही धनमानाची अभिलाषा आता अुरलेली नाही. त्या वीरांगनेला जर कोणता अिच्छावर हवाच असेल तर तो अेका अिच्छा—वराचाच होय !

**अृषिकुमार**:—काय ? अिच्छा वर ? मग त्या माझ्या वीर भगिनीची ती अिच्छाही पुरवणें अशक्यच कां असावें ? सरदार, दुर्गावतीच्या अिच्छावराचा अुल्लेख करताच तुमच्या स्वतःच्या हृदयाच्याही कोणच्यातरी कोमलांतील कोमल धाग्यास धक्का लागावा तसा आपला कंठही भरून आल्यासारखा कां झाला ? स्वर का कांपला ? अेखादें अेकच शल्य आपल्या दोघांच्याही हृदयांस विव्हलवीत आहे कीं काय ?

**सरदार**:—हाय हाय ! अृषिकुमारजी, जें विचारूं नये तेंच आपण विचारलेंत आणि आपल्यासारख्या पुण्यवंताच्या आणि यशवंताच्या ह्या दुर्लभ सहानुभूतिनें भाळलेल्या माझ्या मनास जें सांगूं नये तेंच सांगितल्यावांचून आतां रहावत नाहीं. महाराज, दुर्गावती मूळ अेका तरुण मराठी शिलेदाराची पत्नी. तिचा प्रियपती—तिचा तो अिच्छावर—पानपतीं स्वारीबरोबर गेला त्याचवेळीं ही किशोरीही मराठ्यांच्या छावणींतील अंतःपुरांत होती. शेवटच्या धुमाळींत तो तिचा प्रियकर समरीं पडला असें अैकून आक्रंदत असतांच मराठी अंतःपुरावरही या दुष्ट सादुल्लाखानाचा हल्ला आला. त्या सरशी ही वीर—किशोरी वीरासारखी झुंजत घायाळ होअुन पडली. तशाही

अवस्थेंत साऱ्या मराठी स्त्रियांबरोबर तिलाही पाडाव करून रोहिल्यांनीं फत्तरगडीं आणली, साऱ्या मराठी स्त्रियांबरोबर तिलाही बळानें बाटवली आणि रोहिल्यांत त्या स्त्रियांची त्या राक्षसांनीं जेव्हां वाटणी केली तेव्हां ही रूपसुंदरी नवबाला सरदार सादुल्लाखानानें स्वतःसाठीं राखून ठेवली. तिच्या त्या सुकोमल तनुला त्याच्या कामलालसेचा दंश सर्पदंशासारखा नित्य असह्य होत असतांही सर्पदंशासारखा तिला आपण होअून गतप्राण करूं शकला नाहीं. स्वतःच्या त्या बलात्कारित, पतित देहाचे स्वतःच आत्महत्येच्या तरवारीनें तुकडे तुकडे करून टाकण्याचा विचारही तिच्या मनांत येअी—पण पुन्हा तिला वाटे कीं आत्महत्येनेंही देहास जी अेकदां त्या दुष्टाच्या बलात्कारी स्पर्शानें पापी दुखापत झाली ती झालीच नाहीं असें थोडेंच होणार आहे. मग निरपराधी स्वतःसच निष्कारण ठार करण्यापेक्षां पुढें मागें दिल्लीवर मराठी सेना चालून आल्यास त्या संधीत फत्तरगडातील ह्या साऱ्या आततायांचीच राखरांगोळी करावी नि त्या पुण्याअीने ह्या पापाचे प्रायश्चित घ्यावें हेंच अुत्तम! असा विचार करून ती संधि साधण्यास ही वीरकन्या देवी दुर्गावती टपत बसली. त्या काळसर्पाच्या संतत दंशाच्या भयंकर कळा सहन करीतही टपत बसली.

**यशवंत०**:—नुसती टपत नव्हे. तर तपत बसली असें ह्मणा! कारण असें देहकृत पापाचरण हें मनःकृत तपस्याचरणच आहे! मनस्कृतं कृतं कर्म न शरीर कृतं कृतं.

**अृषीकुमार**:—पण तिचा पती पानपतीं पडला ह्मणजे घायाल होअून पडला असेंच ना? तो नित्याचाच रणीं राहिला असें कांहींचेबाहींच अशुभ तर आपण सागत नाहीं?

**सरदार**:—तो तसा नित्याचाच रणीं राहाता तर मी अिथें आपल्यासमोर आज अुभा कसा अ ?

**यशवंत**:—ह्मणजे ापणच— ?

**सरदार**:—होय, ह राज, मीच तो दुर्गादेवीचा पानपतीं पडलेला पति! दुर्गादेवीसुद्धां साऱ्यांस न पडलों असें वाटत असतांहीं मी सावध झालों, शत्रूंच्या हातीं गवसून विदेशीं नाना संकटें भोगीत शेवटीं मोठा मानसन्मान मिळवून देशीं परतलों. तेव्हां दुर्गावतीची पूर्वीची अिच्छा ह्मणून तिच्या धाकट्या बहिणीचेंही तिच्या माघशीनें माझ्याशींच लग्न लावून दिलें. पण हें काय? रावराजे, अृषिकुमार, माझ्या या करुणकहाणीनें आपल्या दोघांच्या हृदयांत कोणचीतरी व्याकुल स्मृति जागृत होअून आपण मघापासून कासावीस झालेले दिसत आहां! का! आपले डोळे असे पाण्यानें डवरून का आले? आपणास अशी व्यथा होत असेल तर माझी कहाणी मी यापुढें सांगून आपणांस अधिक कष्टवूं अिच्छित नाहीं.

**यशवंत०**:—नको नको, मिना तसं करूं नकोस, तुझी कहाणी माझ्या स्वत:च्या कहाणीशीं अितकी तंतोतंत जुळत आहे कीं

॥ पद १५ वें. ॥

तुझ्या शोकगीतीं अशा व्याकु ॥
कथा शोक माझाचि गाअूनि गेली ॥
तूं पाहसी वेदनेसी तुझ्या ॥
मधे–आरशा माझिया आसवांच्या ॥ १ ॥

पण यापुढं मात्र माझी कथा माझी नि तुझी! तुझी प्रिया तुला सांपडली–माझी मला नित्याची अंतरली! वियोग माझा वांटा–संयोग तुझा! तर जा आणि तूं आपल्या हरवून सांपडलेल्या तुझ्या प्रियपत्नीशीं, वसंत-वनश्रीशीं, तसा संगम पाव! मी तिला श्रीमंताचें नावें अिच्छावर देण्याचें वचन दिलें आहे. तूं तिचा अिच्छावर आहेस. ह्मणून श्रीमंतांचेंच नावें तिची ती अिच्छा पुरविण्याची मी तुला राजाज्ञा देत आहें! लंकेंत राक्षसांच्या बंदींत राहिलेल्या सीतेचा अंगीकार श्रीरामचंद्रांनीही ह्याच हेतूनें असाच केला!

**सरदार**:—अहाहा महाराज, श्रीसीतादेवीच्या नामोच्चारानें आपण सहसा मी जीस अजून अुच्चारूं धजत नव्हतों त्याच शंकेचा अुच्चार केलात! महाराज मी देशीं परतल्यानंतर कांहीं कालानें जेव्हां मला कळलें कीं माझी दुर्गावती जिवंत असून फत्तरगडीं बंदित आहे. त्यासरशी आनंदाचे भरांत ती ही सीते सारखी निष्कलंक असलीच पाहिजे असें समजून मी तिला सोडविण्यासाठीं नोकर बनून फत्तरगडीं प्रवेशलो. तों तिचें हें विक्षिप्त वृत्त मला कळलं! तें सुमंगल कीं अमंगल; व्रतचारी कीं व्यभिचारी; विचक्षण कीं विलक्षण तें कांहींच मला समजेनासें होअून मी तिचा स्वीकार वा धि:कार कांहीच करूं शकलों नाहीं. केवळ हिंदुपतपादशाहीची जी जिवावरची कामगिरी ती करीत आहे तींत तिला माझी ओळख न देता सहाय तेवढें देत आहें. महाराज, सीतादेवी रावणाचे नुसती बंदींत होती पण तिच्या मनाचें वा देहाचें पावित्र्य लवलेशही भ्रष्टलें नव्हतें; पण!

**अृषिकुमार**:—पण काय? दुर्गादेवीच्याही मनाचें पावित्र्य सीतादेवी अितकेंच अभ्रष्ट आहे. आणि देहाविषयीं विचाराल तर दुर्गादेवीच्या देहाच्या विटंबनेनें ती कमी पवित्र ठरत नसन सीतादेवीची तशी विटंबना न करणारा रावण

काय तो अधिक पापभिरू ठरतो. कारण तो राक्षसी रावण जर ह्या मुसलमानी रावणासारखा, ह्या सादुल्ल्यासारखा, बलात्कारासच धर्मकार्य मानणारा नर-पशु असता, जर त्यानें सीतादेवीवर नुसती कामयाचनाचीच सक्ति न करतां लांडग्यानें हरिणीवर घालावी तशी झेप घालून कामाचाराचीच सक्ति केली असती तर ती जनकतनयाही त्यातून निभावली असती का? आणि जरी नसती तरी ती बलात्काराच्या दंशानें विद्ध सीता सीतादेवी अितकीच निष्पाप पवित्र आणि पावनच असती नाहीं का? कारण तिला पळवताना पंचवटी-पासून लंकेपर्यंत सर्पाच्या वळख्यासारख्या रावणाच्या बाहुपाशाच्या वेढ्यात जख-डून जावें लागलें असल्यामुळें आणि लंकेत त्याच्या अनर्गळ कामयाचना अैकून विटावें लागलें असल्यामुळें स्पर्शदोषानें तिचा देह विटाळावयाचा तो या ना त्या प्रमाणात विटाळलाच होता. आणि तरीही ती आत्मघात न करता जिवंत राहिलीच होती. तथापि तिचें मन विशुद्ध गंगाजलासारखें निर्मळ होतें ह्मणूनच सीतादेवीच्या निष्कलंक पावित्र्याची आणि पातिव्रत्याची साक्ष प्रत्यक्ष जातवेद वैश्वानरानें दिली!

**सरदार:**—हें साचें, जें आपण अुपदेशाल तेंच श्रेय आणि रावराजासारखा धर्मवीर जें आचरील तेंच धर्म हीच आमची निष्ठा, यास्तव आता, रावराजे, आपणांस हाच शेवटचा प्रश्न—की—कीं—विचारूं ना तो प्रश्न? होअील ना क्षमा माझ्या या भक्तीच्या लडिवाळ धारिष्ट्याची? कीं जर आपली ती पान-पतीं हरवलेली प्रियतमा माझ्या या दुर्गावतीच्याच स्थितींत तंतोतंत असती नि असेंच आचरण करीत असता आपणास अशीच पुन्हा गवसती—तर आपण तिच्या अखंडित प्रेमाचें पुन: पाणिग्रहण करता का? बोला—अेका बोलात बोला की देवी दुर्गावतीला तुला तुझा अिच्छावर देअीन ह्मणून दिलेलें हें वचन तुह्मी तरीहि पुरवितां का की जर आपणच तो तिचा अिच्छावर असतेन!

**यशवंत०:**—मित्रा, हें तूं काय विचारतोस! सगळेच दयित तुझ्यासारखे सुदैवी नसतात! पण विचारतोसच ह्मणून सांगतों कीं जर माझी दयिता, माझी सुनीति, या वीरांगना दुर्गावतीसारखी देवांचें कार्य साधण्यास्तव, स्वतः नरका-ग्नींतही अशी तपत जळत, राहाण्यास न कचरती आणि अशक्य तें शक्य होअून तिच्या दैवीक्रोधाच्या सुरुंगानें दैत्याची लंकाची लंका अशी अेकटी अुडवून देताना मला भेटती तर सीतेला रामचंद्रानें जशी आलिंगिली तशीच मी तिला पुन्हां आलिंगिली असती अितकेंच नव्हे तर देवालयांत देवता पूजि-

तात तशी मी तिला आपल्या हृदयाचे गाभाऱ्यांत स्थापून प्रेमाची पूजा बांधिली असती ! अरे पण हें काय ! [ तो तरुण सरदार हळुहळु पुरुष वेष टाकीत चांलला असतां ] ऋषिकुमार ! ऋषिकुमार ! ह्या तरुण देहाच्या फलकावरून त्या सरदाराच्या आकृतीस साफ पुसटून टाकून, माझा भास, लावण्याच्या कुंचलीनें, कोण्या कमनीय कामिनीचें—माझ्या प्रेमळ प्रियेचें, चित्र झटपट रंगवीत चालला आहे !—रंगवून गेला देखील ! निःसंशय, निःसंशय, ही तर माझी पानपती साडलेली सखी—माझी आज सांपडलेली सुनीति ! होय ना ? दयिते: तीच ना तूं ?

सुनीतिः—होय, देवा ! मीच ती आपली दुष्ट दयिता, पापी पतिव्रता, दंडनीय पण दयनीय, दुर्विनीता सुनीति ! नाथ, तरुण सरदाराचे भिंत्रे जिनें आपणास अितका वेळ वंचिलें, देवी दुर्गावती ह्मणून जिला आपण आजवर गौरवीत आलात, ती दुर्गावती मीः आणि तिला जो अिच्छावर देण्याचें वचन आपण दिलेंत तो तिचा अिच्छा—वर आपण ! सख्या, अनन्य आपण !

यशवंत०:—तर मग जो वर देवापाशीं जीवेंभावें स्वतःसाठीच मागावयाचा तोच वर दुसऱ्याला देण्याचें सामर्थ्य देवानें आज मला दिलें ह्मणावयाचें ! अहाहा ! हा आनंद अुपभोगावयास आपली आवडती सुशीला अिथ हवी होती ! पण अजून अशी दूर का ? ये दयिते ये ! ( आलिंगिण्यास जातो. )

सुनीतिः—नका, नका, नाथा, आपल्या गळयात आता रुळत असलेली माझ्या पाठच्या प्रेमळ नि निष्पाप बहिणीची माझ्या सुशीलेची ती कुसुम कोमल वरमाला या पापिणीच्या आलिंगनानें विटाळेल, कुस्करेल, कोमेजेल ! आपलें आलिंगन हा आता तिचा अधिकार ! ती प्रत्यक्ष भेटून अनुमोदन देअीतों तरी—

सुशीलाः—देअीतों कशाला ? ताअी ! ( अृषिकुमराचा वेष टाकून प्रकटते ) ही बघ तुझी सुशीला, तुला अिथल्या अिथेंच अनुमोदन देत आहे ! ज्या माझ्या अधिकारावर तुझा अधिकार चालत नाहीं असा आप्पलपोटा अधिकार मला मुळीच नको. ताअी तूं ज्यांत वाटेकरी होअूं शकतेस तेंच खरें सुख ! तें वाटलें न जाता अलट दुहेरी वाढेल—आपणा दोघींसही धन्यवील प्रिया. ओळखलं ? कोण मी ?

यशवंत०:—आश्चर्य ! सुशीले ! तर मग तूंच कां या अृषिकुमाराच्या वेषानें अितके दिवस माझ्या संगतीत निवसत होतीस ? पुण्याहून येण्याचें हें धाडस केलेंस तरी कसें ? किती लबाड आहेस ! असें फसविलेंत अं मला ?

**सुशीला**:—राग आला असेल तर क्षमा असावी! पण, प्रिया, आपली अ्सिलता रणीं झुंजत असतां माझ्या तनुलतेस गृहीं गंजत पडवेच ना म्हणून आलें! आतां जाअूं द्यावे ते सारे. जे अंती गोड ते अवघे गाड! ताअी, घे मला! मी तुझी पाठची प्रेमळ बहीण आहें (दोघी भेटतात)

**यशवंत०**:—शेवटीं बहिणीस बहीण मिळाली नि आम्हींच काय ते गयस्था-सारखे बाजूस पडलों! तुम्ही दोघी बहिणी—

**सुशीला**:—दोघी नव्हे, सख्या, आम्ही अशा (मिठी मारीत) दो अेकीं अेक आहोंत, अेक प्राण, अेक जीव! नाथा, आता आम्हां जुळया गंगायमुनांचा प्रेमप्रयागी अेकवटलेला हा जीवनौघ तुझ्या हृदयाच्या क्षीरसागरांत विलीन होअूं द्यावा!

**सुनीति**:—हें अेक देठी जुळें फूल, देवा, आपल्या चरणी असें वाहूं द्यावें.

(दोघी गुढघे टेकून दो बाजू दो चरणापुढें आनत होतांच— )

**यशवंत०**:—पण अशीं सुकुमार सुमंगल फुलें पायदळीं पडूं देण्याअितके देवेंहा अरसिक नसतात. गोपीवल्लभ गोविंद गोकुळींच्या वनमालांची वैजयन्ती अशी कंठीं धारण करीत! (दोघींस दोन बाजूस लगटून घेतो.)

(तोंच पडद्यांत शिंग वाजून बार होतात.)

**सुनीति** (दचकून):—सख्या, संपलें माझें—क्वचित शेवटचेंच ठरणारें, हें सुखस्वप्न? ती अका—गोकुळाच्या गोड गुंगीस भंग करणारी कर्तव्य—अंकुराची हांक! किल्ल्यावर मी नसल्याचा बोभाटा होण्याचे आधीं मला परत जाता यावें म्हणून शेवटची सूचना मला मिळण्यासाठीं हें शिंग फुंकण्यास नि बार काढण्यास मी सांगून ठेवलें होतें! जाते—सख्या! —बाळे सुशीले— जातें मी!

**सुशीला**:—पण ताअी थोडी तरी थांब ना, ताअी—

**सुनीति**:— नाहीं, बाळ, नाहीं! ठरलेला बेत प्रथम पार पाडला पाहिजे! आता पुन्हां मी दुर्गावती, तूं अेक अनोळखा अृषिकुमार, आणि रावराजे मराठ्यांच्या सरसेनापतींचे प्रतिनिधी. फत्तरगडावरील त्या झाडूनसाऱ्या मुसलमानी सैन्याशी राखरांगोळी अुडेतों, झाली हीच भेट, त्यांतून जगलों तर पुन्हा भेटूं. न जगलों तर (तलवार उपसून) हरहर महादेव! हरहर महादेव!

(ती जाते. पडदा पडतो)

**—: अंक तिसरा समाप्त. :—**

# अंक चवथा.

—**—

## प्रवेश १ ला.

( मराठ्यांची छावणी. )

**कोंडण्णाः**—( मोठ्या अधिकाऱ्याच्या थाटांत )—हं, मागें हट ! धोंडण्णा, आतां मी—गजान्तलक्ष्मीचा धनी !—तूं माझा नुसता कारभारी ! म्हणून असा पहिल्यासारखा खेटून चालूं नकोस ! ते पहा आलेच रावराजे यशवंतराव—मला कायसें सागणार आहेत म्हणे.

**यशवंतरावः**—( शिपायांच्या नायकासह प्रवेशून )—कोंडण्णाजी, सादुल्ल्याला द्वंदयुद्धात ठार मारून त्याचें शीर कापून आणणारे वीर आपणच ना ?

**कोंडण्णा:**—तें आतां मी का सांगावयास पाहिजे ? अहो सादुल्ला म्हणजे केवळ लंकेतला राक्षस ! अुंच अितका कीं स्वतःचें डोकें खाजवावयाचें तर स्वतः खाली बसल्यावाचून त्याचादेखील हात त्याच्या डोक्याला पोचूं नये ! तसा धिप्पाड राक्षस कमीतकमी शंभर नि जास्तींत जास्ती हजार अितर राक्षसांसह चालून आला ! आणि मी अेकटा ! अहो काय सागावें !

**यशवंतरावः**—पुरे. जास्त कांहींच सागूं नका. सारांश हाच ना कीं तुम्ही त्या साऱ्याना अेकट्यानें धुळीस मिळविलेंत ? बस तर असा तुमचा पराक्रम जाणूनच अुद्या अेक जिवावरची कामगिरी तुम्हांकडे सोंपविली आहे. मुसलमानाच्या सशस्त्र पहाऱ्यांतून जाअून दारूच्या अेका भयंकर कोठारास बत्ती द्यावयाची ! स्फोटाचे धडाक्यात सांपडलांत तर अंगाच्या चिंधड्या अुडतलि ! असें धाडस आपणांवाचून कोण करणार ! कारण, आतांच तुम्ही सागितलेंत ना कीं कमीत कमी शंभर नि जास्तींत जास्ती हजार रोहिल्यांशीं अेकटे तुम्ही —

**कोंडण्णाः**—छे छे, तसेंच कांही म्हणतां येत नाहीं. अंधेरांतली ती झुंज ! मोजणार कसें ! मजवर तुटून पडलेली ती शत्रंची टोळी क्वचित दहापांच जणांची देखील असूं शकेल !

**यशवंतरावः**—पण सादुल्लाखानासारखा लंकेतला राक्षस तरी तुम्ही ठार केलातच ! तें कांहीं नाहीं. तुम्ही शूर. ही जिवावरची कामगिरी बजावलीच पाहिजे.

**कोंडण्णा:**—क्षमा करा सरकार, जिवावरची कामगिरी झटली कीं ती बजावणें माझ्या अगदी जिवावर येतं! हात जोडतों. मी खरोखर तितकासा शूर नाहीं.

**यशवंतराव:**—छट्, नाहीं ह्मणाल तर अिथेंच तुमचें डोकें अुडविलें जाअील. सादुल्लाखानाला ठार मारणारा तितकासा शूर असलाच पाहिजे.

**कोंडण्णा:**—काय हा भलताच आरोप, सरकार, मज बापड्यावर! खरोखर सादुल्लाखानाला मी ठार मारलें नाहीं!

**यशवंतराव:**—मग डोके कुणाचें कापून आणलेंत? खरें सांगाल तर क्षमा होअील.

**कोंडण्णा:**—सरकार, अगदी खरें सांगतों. कीं तें सगळें खोटें होतें डोकें सादुल्लाखानाचें नव्हे. त्याच्या प्रेताचें कापून आणलें! त्याला दुसरेंच कोणी ठार केलें होतें. सरदारसाहेब! मी निरपराधी ब्राह्मण! जन्मात मी कोणास ठार केलें नाहीं, या अुभ्या स्वारींत जी काय पांचदहा डोकी कापली तीं प्रेतांचीच कायतीं होत! हा धोंडण्णा माझा त्या सर्व कृत्यांतील साथीदारच आहे—त्याला विचारा हवें तर!

**यशवंतराव:**—असल्या अपराधासाठी अिथल्या अिथेंच डोके अुडवावयास हवें. पण कामगिरी देतों ती तुह्मी दोघे झटपट करून जिवंत निसटाल तर तुह्मांस यापुढेंही जगण्याची अेक आणखी संधि मिळेल! नाअिक धरा ह्या दोघासही, अुयां दारू कोठारास आग लावण्यासाठी ह्याना त्या बोगद्यात मशाली देअून धाडायचे. अळेटळ करताच भाल्यानें ठोंसून आंत ढकला या चोराना! चलो! (नाअिक धरून नेतात. पडदा पडतो.)

---

## प्रवेश २ रा.

(फत्तरगडचे दारूकोठारापाशीं.)

**वेडी:**—अंधार! शत्रूच्या या दारूगोळयाच्या कोठाराभोवतीं हा कोण काळाकभिन्न अंधार! पण वेडाच्या बुबडी डोळयांनून मला ह्या अंधेरामधलेंच नव्हे तर त्या अंधेरानंतरचें देखील कसें स्पष्ट दिसत आहे! हे पहा होणारातून कोण्या भयंकर आगीचे लोळचे लोळ होत असल्याकडे उतरत आहेत! (शिटी वाजते) हाः हाः हाः! आले अचानक छापा घालण्यास माझे मराठे वीर ह्या गुप्त भुयारांतून येअून गडाच्या आंत अेकदांचे निर्विघ्नपणें उतरले!

कोण? सुनीति? आव बेटी आव (सुनीति धोंडण्णा–कोंडण्णा नि कांहीं सैनिकांसह येते.) बघ माझें काम मी कसें चोख बजावलें आहे तें! ह्या शत्रूच्या दारूकोठारावरील हे पठाण पहारेकरी दारू पाजून पाजून मी झिंगवून पाडले नि लगेच खंजिराच्या धारेच्या अुतारनें जीवनाच्या पल्याडच्या मरणपुरींत पोचवून दिले! अुघड तूं या तीन्ही कोठारांची तीन कुलुपें? मी आलेंच बघ ह्या मशाली पेटवून! (ती जाते–सुनीति कुलुपें अुघडते तोंच वेडी तीन मशाली पेटवून पुन्हा प्रवेशते. मशाल कोंडण्णा धोंडण्णाच्या तोंडापुढें करून) अस्सं! हे का ते राजश्री! बरी मेल्यांच्या तोंडाना पोलादी कुलुपें ठोकून मुस्कुटबंदी करून आणलेत.

सुनीतिः—हं धोंडण्णा ही मशाल घेअून तूं या बोगद्यात न धोंडण्णा तूं ही मशाल घेअून या बोगद्यांत शिरावयाचें, नि आतील दारूकोठारास बत्ती द्यावयाची! चपळाअीनें काम कराल तर जिवंत परतूं शकालही!

वेडीः—भिअूं नका कोंडूबाअी! कारण मी पण ही तिसरी मशाल घेअून तुह्माला सोबत करण्यासाठीं ह्या तिसऱ्या बोगद्यांत ह्या तिसऱ्या कोठारास आग लावण्यास घुसतच आहें! चलो! हे लांब भाले तुह्मांस दारूपर्यंत नेअून पोचवितील! (भालाअीत त्या दोघांस ठोसीत, बोगद्यात घालूं लागतात) हं बाळे, सुनीति! जा, ह्या स्फोट होतांच दबा धरून बसलेल्या तुह्मीं शत्रूंवर अेकदम छापा घालावा!

सुनीतिः—आअी, आअी, ह्या भयंकर अग्निदिव्यात शिरताना देवाचं नांव घेअून तरी शीर! ह्मणजे तो ह्या अग्निकल्लोळातूनही आपल्या दयेच्या अदाह्य वर्माखाली झांकून तुला सुखरूप परत आणील!

वेडीः—छट, वेडी कुठली! अग आपल्या मनाप्रमाणेंच घडावें अशी लघाळ आशा देवाचं नांव घेते तें अशा वेळीं काय अुपयोगी! काय वाटेल तें होवो अशी निडर निराशा सूडाचं नांव घेते तेंच अशा वेळीं अुपयोगी! ह्मणून ह्मण–सोनपत! पानपत! (मशाल घेअून बोगद्यांत शिरते, पडदा पडतो.)

---

## प्रवेश ३ रा.

(मुसलमान शिपाई फत्तरगडावर दंवडी पिटतात)

मुसलमान दंवडीवालेः—"हुःशार! हुःशार! फत्तरगडच्या रोहिले बहादूरांनो, सारें लष्कर हत्यारबंद होअून लढाअीस बाहेर पडा! बारूदखान्यास

मोठी आग लागली आहे! कांहींतरी मोठा दगा करून मराठी फौज अचानक किल्ल्यांत घुसून तिकडे हाणमार करीत चालली आहे! बाहेरूनहि मराठ्यांनीं चारी बाजूंनीं किल्ल्यावर चढाअी केली! दौडो हत्यारबंद होके, तमाम बंदीवान मराठी औरतोंको कत्तल करके, दुष्मनको रोखनेको दौडो! अल्ला हो अकबर!" (ढोल पिटीत जातात.)

---

## प्रवेश ४ था.

(दारू कोठारांची आग भडकली आहे, स्फोट होत आहेत, आगीच्या लोळामध्यें मध्यंतरीं अुंच चबुतऱ्यावर वेडी अुभी आहे.)

**वेडी:**—भडक रे भडाग्नि भडक! दारूगोळ्याचीं सारीं कोठारेंची कोठारें तुझ्या जळत्या जबड्याच्या कुंडांत ढकललीं! ते बिचारे धोंडण्णा नि कोंडण्णा मघांच अेकाद्या कापसाच्या वातीसारखे सुरसुर जळून गेले! पण तरीहि भडक रे भडाग्नि मला जाळीतों भडक! त्या पुण्याच्या भटानें ज्या दीड लाख पठाण रोहिल्यांच्या आहुति—समिधा—तुझ्या खाअींत ढकलल्या त्या—नजिबाच्या—बंगषाच्या—सादुल्ल्याच्या—अब्दालीच्या दौलतीचीं, दिमाखाचीं हीं—मी ठेंचून वेंचून आणलेलीं लाख। हाडहाडकें—स्वाहा! स्वाहा! वसानसा—स्वाहा स्वाहा! मोंगल पादशाहीची पादशाही, डेरे दांडे, राहुट्या, राजवाडे, ताजतक्तसुद्धां स्वाहा! स्वाहा! काण? पोलादखान? यावें! बच्चंमजी तुह्मीं पण स्वाहा स्वाहा!

**पोलादखान:**—(शिपायांसह प्रवेशून) तोबा! तोबा! यहि वह पागल पिशाच! अिधरभी क्या सैतानी जादू फूंक रही है! गोली करो—मारो!

**वेडी:**—मार, मुर्दाडा, मार मला! पुरत्या अुगवल्या जाणाऱ्या सूडाची भडकती दारू पिअून मीं जों अशी झिंगलेली आहें, तोंच तर मरणाची मोज! अुगवून संपलेल्या सूडानंतरच्च नुसत्या यशाचें पाणचट जिणें हवें आहे कोणाला? पानपतीं निधन पावलेल्या अतृप्त अशांत आत्म्यांनो, आता तृप्त व्हा! शांत व्हा—तुमच्या अुत्तरक्रियेच्या शेवटच्या निधनशांति होमांत माझी, सूडाच्या अग्निकल्लोळांत सूडाचीच—पूर्णाहुति पडत आहे! हे दुष्मनानो, झाडा

बंदुका ! माझ्या बेताळ नाचाला-धरा त्या बेताल बंदुकांचा ताल !!( मुसलमान बंदुका झाडूं लागतात, वेडी डमरु वाजवीत नाचते )

सोनपत पानपत
गेली होती सारीपत
( पण ) पातशहा हिंदुपद
मोंगलांच्या पादशाहीचं पाडून रणांत धूड !
केलीत अुत्तरक्रिया ! घेतलात भाअूंचा सूड ! !
विश्वासचा सूड ! ! पानपतचा सूड ! !
( गोळयांच्या वर्षावांत आगींत धाडकन अुडी घेते. )

---

## प्रवेश ५ वा.

**सुनीतिः**—पानपतच्या विजयाचें स्मारक ह्मणून त्या दुष्ट नजीबखानानें बसविलेल्या ह्या त्याच्या नजीबाबाद शहराची नि त्याच्या फत्तरगडाची राखरांगोळी केली ! महाराष्ट्रीय वीरहो ! आतां बघतां काय फोडा, ती नजीबखानाची कबरसुद्धां फोडून चुरा करा. ( मराठे कबर फोडतात ) नजीब, पानपतचा विजेता ह्मणून तुझें नांव ज्या या तुझ्या भव्य कबरीवर कोरलें होतें त्या या कबरेचे तुकडे अुडवून तुझ्या हाडांच्या ढिगाऱ्यावर ही मी महाराष्ट्रीय सुनीति अशी नाचते आहे हें तुला दिसतें कां ? काय ह्मणतोस मेल्याला मारणें कुनीति आहे ? रणांत पडलेल्या दत्ताजीच्या मस्तकास लाथ मारणाऱ्या आणि पानपती पाडाव झालेल्या हजार हजार मराठ्यास दावणीस बांधून गुरासारखीं त्यांची सपासप डोकी अुडविणाऱ्या क्रूर कसायानों, तुह्मास तरी तसें ह्मणण्यास तोंड नाहीं !

**सुशीला** ( रणवेषांत प्रवेशून ):—ताअी, रोहिल्यांच्या बंदींतून साऱ्या मराठी स्त्रिया मुक्त झाल्या अितकेंच नव्हे तर अुलट मुसलमानी थोर थोर स्त्रिया आह्मीहि पाडाव केल्या ! ते पहा माझे सैनिक त्यास तुझ्याचकडे आणीत आहेत ! ( मुसलमानी स्त्रियास घेअून सैनिक येतात. )

**सुनीतिः**—कोण ? ह्या रोहिल्याच्या राजाच्या, स्वतः नजीबखानाच्या नि झबेताखानाच्या राजस्त्रिया, राजस्नुषा राजकन्या ! आणि ह्या तर प्रत्यक्ष

बिबिसाहेबा! वा! काय बिबिसाहेबा, मला ओळखलंत कां? जिला तुह्मी मराठ्यांची पाडाव केलेली दासी, बांदी, काफराणी ह्मणून आज दहा वर्षे खिजविलीत झिजविलीत, बाटविलीत, भ्रष्टविलीत, ती मी सुनीति आहे!—बिबिसाहेबा, त्याच मराठी बादीच्या आज तुह्मी साऱ्या रोहिल्या सरदारिणी बंदिवान झाल्या आहांत! बोला, मराठ्यांनीं रोहिल्यांचा सूड पण सूड अुगविला नाहीं कां? अेखाद्या नाटककारास देखील कल्पित कथानकांतही अितक्या कुशल कुंचलीनें क्रियेप्रतिक्रियेची, घटनेघटनेस प्रतिघटनेची अशी तोडीसतोड रंगवितां आली नसती. अितिहास कधीं कधीं कवितेहूनही अधिक अद्‍भुत असतो तो असा! बरें, पानपतची फिटंफाट अगदीं शेवटची पैही देअून पुरी करून टाकण्यासाठीं मी तुह्मांस मराठ्यांकरवीं आता तशीच खिजवूं का, झिजवूं कां, कष्टवूं कां, भ्रष्टवूं का कीं जसे तुह्मी आह्मां मराठी स्त्रियांस कष्टविलेंत, भ्रष्टविलेंत! कोण? सरदार महादाजी शिंद्यांची स्वारी! (अितक्यात महादाजी येतात. सुनीति मुजरा करते.)

**बिबिअम्मा**:—या, या सरदार महादाजीसाहेब! ह्या सुनीति बाअीच्या संतापापासून आमचें रक्षण करणारी ढाल व्हा! शत्रूच्या स्त्रियाची स्पर्शानें देखील विटंबना करूं नये हा हिंदूंचा धर्मच आहे!

**सुनीति**:—हिंदुचाच कां, तो खऱ्या मुसलमानांचाही धर्म असावयास पाहिजे. कारण तो माणुसकीचाच धर्म आहे. तसें समजणाऱ्या भल्या मुसलमानी माणसाच्या पायाचा अंगारा मी अेकाद्या हिंदुसाधूच्या अंगाऱ्यासारखा मस्तकीं धारण करीन! पण मला जे तुह्मी हजारो रोहिले पठाण भेटलांत ते सारे पानपतच्या तुमच्या मुसलमानी विजयाची पूर्णता तुह्मी हिंदूंच्या बायका देखील लुटून अुपभोगूं शकतां, या राक्षसी मापानेंच धडधडीत मोजीत आलात; ह्मणून आता हिंदूंचा सूडही त्याच मापानें तुह्मास आह्मी मोजून देणार! तें कांहीं नाहीं; सरदारजी, आह्मा मराठी स्त्रियांस ह्या राक्षसांनीं—बिबिसाहेबा प्रत्यक्ष तूं देखील—ह्या रोहिलखंडांतील बाजारांतून भाजीपाल्यासारखे जसें विकलेंत तशीच पुण्याच्या बाजारांतून तुमची धिंड आह्मी काढणार! हिंदूंही आपल्या स्त्रियांची तशीच विटंबना करण्यास सोडीत नाहींत असा दरारा बसल्यावांचून अहिंदु दैत्यांस लागलेली ही पुरातन खोड सुटणार नाहीं! त्राटिकेचा वध करणाऱ्या नि शूर्पणखेचें नाक कान कापणाऱ्या पुरुषोत्तम रामचंद्रांचा दुर्जनभंजक हिंदुधर्म आह्मी पाळला पाहिजे; हा दुर्जनरंजक हिंदुधर्म नव्हे!

महादाजीः--हे वीरांगने, अेकाद्या सिंहिणीचा क्रुद्ध आवाज आपल्या प्रतिध्वनीनें दूरची गुहा जशी घुमवून सोडतो तसा तुझा संक्षुब्ध शब्द नि शब्द माझ्या हृदयात प्रतिध्वनत आहे! पण काय करूं श्रीमंताच्या अमोघ आज्ञेची अग्निकक्षा मला तर काय पण सरसेनापतीनाही आज तरी अनुलंघनीयच आहे. शत्रूच्या पाडाव केलेल्या बायकामुलांनां जीवदानच नव्हे तर अभयदानही श्रीमंत देऊन चुकले! (तोंच पडद्यातून दीन! दीन! चा गलका होतो) काय कसला गलका आहे हा?

शिपायीः—महाराज, सावध! सावध! सरदार महादजी शिंद्यांचा घात करण्यासाठी दबा धरून बसलेल्या पोलादखानाची तुकडी शिंदे सरकारास अिथे अेकटे पाहून चालून आली आहे! (मराठे हरहर करून तरवारी अुपसतात तोंच दीन! दीन! करीत पोलादखान ससैन्य तुटून पडतो. महादाजीवर येण्याआधीच सुनीति सुशीला त्याच्याशी लढून त्यास ठार मारतात--पण त्याच्या घावानें सुनीतीही मर्मी घायाळ होते.)

सुनीतिः—(पोलादखानाचे छातीवर पाय ठेवून अुभी राहून) मारला; पानपतच्या मराठ्याच्या शत्रूपैकी अुरलेला शेवटचा कुंजता रोहिला मी ठार मारलाः आः मी कृतकृत्य झालें! हें माझें आयुष्यही परीपूर्ण झालें! सुशीले, हात दे! आः आः (तोंच यशवंतराव आणि सरसेनापति येतात.)

सुशीलाः—या, सख्या, या, लवकर या, ताअी घायाळ झाली-मर्मी घाव लागला!

यशवंतरावः--सुशीले, सखे! हाय! हाय!

सुशीलाः—का नाथ, हाय हाय का? आत्महत्येच्या पालापाचोळ्याच्या चित्तेवर मी कधीच जळावयाची! तों सुबुद्धि सुचून आज मराठ्यांच्या हाडवैऱ्याचें वैर अुगवीत धर्मसमरीं अभिमुख आघातीं घायाळ होऊन आपल्या चरणापाशी मी नित्याची निजते आहे. याहून सुखकर मरण तें कोणचें! हिंदुपदपादशाहीचे सरसेनापति, सरदार, आणि सैनिकहो, शत्रूच्या स्पर्शानें मलीन केलेला माझा देह शत्रूच्या रक्तानें मी धुतला आहे—या माझ्या हिंदुधर्माच्या पवित्र ध्वजाखालीं हिंदु ह्मणून मला तो देह ठेवण्याची अनुज्ञा दया करून द्याल का? माझा खड्ग कुठें आहे! तोच माझ्या ह्या विनंतीचा वशिला!

**सरसेनापती विनीयाले:**—हे हिंदुवीरांगने तुझ्यावर महाराष्ट्राचा हा प्रत्यक्ष सरसेनापति हिंदुधर्माच्या ध्वजाचें वीरछत्र धरीत आहे आणि हे त्याचें रत्न-खचित खड्ग तुझे हातीं समर्पून तुझ्या महनीय राष्ट्रसेवेस गौरवीत आहे!

**सुनीति:**—मी धन्य झालें! येते मी! परमप्रतापी श्रीमंत माधवराव पेश-व्यांचे चरणीं माझा दंडवत कळवा—ज्या माझ्या महाराष्ट्राच्या, माझ्या माहेराच्या, मातींत मी जन्मले तींतच माझी माती तरी परत पडू द्यावी! आणि आता हिंदुत्वाच्या अपजयाचें दारुण दुःख ज्या मी जन्मभर सोसलें त्या मला मरतांना तरी हिंदुधर्माच्या जयवाद्याच्या निनादात सुखानें मरूं द्यावे!

( जयवाद्यांचे निनादात गतप्राण होते. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश ६ वा.

( स्थळ—शनवार वाडा, पुणें. )

**माधवराव:**—फडणीस, काय ह्मणतां? सुनितिदेवी रणांत अशी झुंजून पडली? वारे स्त्रीरत्न! सरसेनापतींना त्वरित कळवा कीं त्या सतीच्या अस्थी आणि रक्षा तिच्या अंतिम अिच्छेनुरूप महाराष्ट्रीं आणून, हिंदुधर्मानुसार त्यावर भव्य छत्री बांधावी! त्याचप्रमाणें ज्या मराठी स्त्रिया रोहिल्याच्या बंदीतून मराठ्यानीं आज मुक्त केल्या, त्या साऱ्यांना परत हिंदुधर्मी स्थापून, चोळी-बांगडी ह्मणून सरकारातून नेमणुका करून द्याव्या. बरें, सेनापतींच्या पत्रांतील पुढील आशय कोणता?

**फडणीस:**—दिल्लीच्या बादशहानें दक्षिण अुत्तर सुभ्यासुद्धा झाडून साऱ्या मोंगल बादशाहीची व्यवस्था श्रीमंताचे नावें लिहून दिली. अेक वजीर तेवढा सोडून बादशाहींतील यच्चावत अधिकाऱ्यांच्या नेमणुकासुद्धां मराठ्यांनीं कराव्या हा करार झाला. अिराण, तुराण, बदकशानपर्यंत लौकिक गेला कीं दिल्लीस वस्तुतः हिंदुपदपादशाहीच झाली!

**माधवराव:**—हे वृत्त सरदारांनींहि काबूलच्या अहंमदशाह अबदालीस लखोटे धाडून कळविलें कीं नाहीं!

**फडणीस:**—नुसते लखोटेच नव्हेत तर पेढे धाडून! असा निरोप कळविला



विनीवाले:—तुरयावर महाराष्ट्राचा हा प्रत्यक्ष सर सेनापती हिंदुधर्माच्या ध्वजाचें वीरछत्र धरीत आहे.

[ ८८ ०

की " ज्या हिंदुस्थानच्या मोंगल बादशाहीची व्यवस्था -लावण्यासाठी आपण स्वतःच हिंदुस्थानचे बादशाह होण्यास पानपती आलेत तिची व्यवस्था शेवटीं मराठ्यानी लावली आहे. बादशहा हें नांव तेवढें शाहअलमचे—बादशाही तेवढी श्रीमंताची अशी वांटणी झाली ! त्या आनंदाचे पेढे पाठविले आहेत ते स्वीकारावे आणि ही व्यवस्था पहाण्याचें समाधान अुपभोगण्यासाठीं सिंधु नदी अुतरून पुन्हा अेकदा मराठ्याची गाठ वाटल्यास घ्यावी !

**माधवराव**:—आता बादशाहास आमचा असा निरोप कळवा कीं जर बादशाह मराठ्याशीं यापुढें तरी वैर करणार नाहींत तर, न जाणों, हिंदुमुसलमान हे दोघेही ज्यात बंधू बंधूप्रमाणें समानतेनें नांदू शकतील असें अेखादें खरेखुरें सामाजिक हिंदी साम्राज्य अशा बनावांतूनच आविर्भूत होअूं शकेल. हिंदूंच्या संमतीनें आणि सत्तेनेच जो बादशाह बनूं शकतो तो धर्मानें मुसलमान असला काय नि नसला काय सारखाच ! जर मुसलमान यापुढें तरी भारतमातेस माता नि हिंदूंस बंधू मानतील तर—आह्मी हिंदूंही त्यास बंधू मानूं. त्यास अेकी हवी तर अशी होअील—नाही तर बेकीसही आह्मी भीक घालीत नाही ! फडनीस, आता माझे शूर सरदार जेव्हा पुण्यास परततील तेव्हा त्यास विजयप्रवेशाच्या मिरवणुकीचा मान द्यावा नि सरसेनापति बिनिवाल्यावर तर सोन्यारुप्याचीं फुलें अुधळावीं ! यावें आपण. आह्मास थोडा अेकात हवा आहे. (फडनीस जातात.) शेवटी आमच्या पिढीच्या वाट्यास आलेलें कर्तव्य आह्मी पार पाडिलें. आह्मी पानपतचा सूड अुगवला ! या जगात चिरस्थायी असें काहीच नाही. अर्थात हे स्वधर्मराज्य यापुढेंही वाढविणें वा बुडविणें पुढील पिढ्यांचें दायीत्व ! पण आज तरी मोजली जावी अशी मुसलमानी सत्ता हिंदुस्थानात अुरली नाही ! माझें हिंदु राज्य वृद्धीस लागलें—आतां क्षया तूं माझ्या या जर्जर देहाचा बळी आजच्या आज घेतलास तरी चिंता नाहीं.

॥ पद १७ वें ॥

**आत्मा अजि धाला ॥ आमुचा ॥**
**पानपतचा सूड मराठी अुगवि पुरा झाला ॥**
**वृद्धिंगत कीं महाराष्ट्र हा महा—राष्ट्र झाला ॥**
**क्षया ग्रास तूं सुखें शेष मम जीवन या काला ॥ १ ॥**

अरे, पण हें काय ! समोरचें सारें दृश्य पुसटून चाललें ! नवीन ! हें कोणचे

नवीन दिव्यजगत् मला भासमान होत आहे! (मंजुळ संगीताच्या साथीसह दिव्य राजपुरुष अुतरत येतात. माधवराव गुडघे टेकून त्यांतील प्रमुखास म्हणतात):—

( वैनायक वृत्त )

माधवराव:—

कवण दिव्य पुरुष तुम्ही ? अिंद्र जसा कीं
शोभावा देव पुरोभागि तेवि जो
शोभसि तूं देवांच्या ह्या थाव्यापुढं
अभिधा तव धन्य काय ?

दाहिर:— हिंदुभूषणा !

सिंधु देशचा दाहिर नृपति तोचि मी !
यवनांहीं ओलांडुनि सिंधुनदातें
भरत भूमिवरि पहिला वार घोर जो
हाणियला, त्या वारा वक्षिं विशाला
ज्याचि झेलिला माझ्या ! समरिं मी अणी
हिंदु श्री यवनकरीं पतित जाहली
दुर्दिनिं रे प्रथम त्याचि ! तेथपासुनी
अपमृत्यूहूनि असह्य अपजयांसही
सहत हिंदुवीरनृपति जे शतावधि
म्लेच्छकरांतुनि मागुति जिंकण्याप्रती
ती हिंदुश्री, आले लढत समरीं
आज सात शतकांवरि धर्मशत्रूसीः
धर्मवीर ते ते हे !—पंचनदाचा
हा नृप जयपालः नृप अनंगपाल हाः
हे पृथ्वीराजः संग हेः प्रताप हेः
हरपाल; श्रीगुरु गोविंद; वीर्यवान्
श्रीबंदाः शतशत हे हिंदु हुतात्मे
स्वप्राणा देति बळी !—परि न पडुं बळी
देति हिंदु राष्ट्राचा प्राणः अपेक्षाः
क्षमता प्रतिशोधाची ! ! ! सकल वीर हे—

सर्व राजपुरुष:—

पूर्वज तव तुज अम्हि—अभिनंदितसों, हे
हिंदु वंश भूषण नरवीर माधवा !
धर्मशत्रु विजयांचे, स्वापजयांचे
शल्य सात शतकें जें सलत राहिलें
हृदयि आमुच्या सतत स्वर्गिंही, अहा
तें तूं अुपटूनि अजी काढिसी पहा !
मुसलमीन सत्तेच्या छाटुनी शिरा
करिशी आसिंधुसिंधु हिंदुमय धरा !
अभिनंदन ! अभिनंदन ! तव धुरंधरा !!

( तोंच राजपुरुषांचे मधोमध वर सदाशिवराव भाअू प्रकटून— )

भाअू:— प्रेमाशीर्वाद आणि आमुचे तुला !
पानपताचा अुगवुनि सूड, तपुनी
रिपुरुधिरें हिंदु हुतात्म्यांसि, करिसि गा
अुचित तीच पितरांची अुत्तरक्रिया !!

माधव:— कोण ? अहा भाअू हे ! प्रबळ विक्रमें
अपर कार्तिकेयासम समरिं तळपता
हिंदु राष्ट्रसेनानी पानपतीचा !

( सर्व अदृश्य होअू लागतात. )

जाअुं नका ! काका ! क्षण मारुनी मिठी
भेठ आपुली—

भाअू:— घडेल स्वर्गिं ! शीघ्रची !!

( राजपुरुष अंतर्धानतात. )

( पडदा पडतो. )

समाप्त.

**Echo from the Andamans** मूल्य १ रु स्वातंत्र्य वीर सावरकरांची अंदमानांतील मूळचीं इंग्रजी पत्रें.

**अंदमानची अंधेरी,** मूल्य ॥। वरील पुस्तकाचें मराठी भाषांतर.

**नेपाळी आंदोलन,** मूल्य ॥। नेपाळची ऐतिहासिक माहिती देणारा आणि नेपाळच्या एकमात्र स्वतंत्र हिंदुराज्यांत हिंदुसंघटणाचे चैतन्य संचरविणारा तेजस्वी लेखसंग्रह.

**संघटन संजीवनी,** मूल्य ८=॥। "श्रद्धानंद" पत्रांतील हिंदुसंघटनावरील कांहीं निवडक लेख प्रत्येक तरुण हिंदूनें हे लेख मुखोद्गतच करून ठेवावे इतके ते ओजस्वी आहेत !

**अभिनव हिंदुध्वज,** मूल्य ८- हिंदुमहासभेच्या गेल्या चार पांच अधिवेशनांत जो अखिल हिंदुध्वज उभारला जात असतो त्या कुंडली कृपाणांकित हिंदुध्वजाचें मर्म ह्या निबंधांत विशदिलें आहे.

**मराठी भाषेचें शुद्धीकरण,** मूल्य ॥=; मराठी भाषेस परकीय शब्दांचे तावडीतून सोडविण्याची चळवळ महाराष्ट्रभर फैलाविणारा निबंध.

**गोमांतक** खंडकाव्य, मूल्य २ रु पृष्ठें २३२

**स्फूर्ति,** बॅ. सावरकरांच्या निवडक कविता; पृष्ठें १००, मूल्य १ रु ( लवकरच प्रसिद्ध होईल. )